







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

# दीपावली

वर्ष १८ वें
जुलै १९६२

साहित्य• कला• संगम

## श्रेयनामावलि—



सदरें:—



या अंकांतील '**भानगडीचें लग्न**' व '**घराकडे**' या कथा '' **द पर्शिया मॅगेझिन**' यांतील कथांचे अनुवाद आहेत. अनुवाद प्रसिद्ध करण्यास परवानगी दिल्याबद्दल चालकांचे आम्हीं आभारी आहोंत.

**—संपादक**

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टेलिफोन
७७७६५

* संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ * या प्रतीस किंमत रु. १ अधिक रजिस्टर पोष्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. * या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं.



अनुक्रमणिका










बाण :

## कविता कामिनीचें स्वप्न

**स्फुरत्कलालापविलासकोमला कथा जनस्याभिनवा वधूरिव ॥**

'गद्यं कवीनाम् निकषं वदन्ति' असें संस्कृत साहित्य शास्त्राचें वचन आहे. गद्य हें कवीच्या प्रतिभेची कसोटी होय. या कसोटीला पूर्णपणें उतरून बाण हा संस्कृत गद्यलेखकांमधें सर्वकालीन सर्वप्रथम अशी मान्यता पावला आहे.

धनुर्बाणाचा आवाज कानीं पडतांच वेदपठण करणारे ब्राह्मण ज्याप्रमाणें भिवून गप्प बसतात त्याप्रमाणे कादंबरींतील बाणाचा आवाज कानीं पडतांच विद्वान लोक मौन धरून बसले असें बाणाचा एक टीकाकार म्हणतो. दुसरा म्हणतो, 'कुणी कोट्या करण्यांत तर कुणी शब्दरचनेमधें, कुणी रसनिष्पत्तीमधें तर कुणी अलंकार योजनेंत, कोणी विषयगांभिर्यांत तर कोणी कल्पनारचनेंत चतुर असेल. पण या चातुर्यानें मदोन्मत्त झालेल्या साऱ्या कवींचें गंडस्थळ फोडणारा एकटाच कविसिंह म्हणजे बाण होय.'

अशा स्पृहणीय गौरवास पात्र झालेला हा बाण इसवीसनाच्या सातव्या शतकांत श्रीहर्षाच्या दरबारांत ठाणेश्वर येथें होऊन गेला. संस्कृत कवींची नेहमीची खोड सोडून त्यानें आपलें पुरेसें चरित्र आपल्या ग्रंथांत लिहिलें असल्यानें त्याच्या भोंवतीं दंतकथांचें वलय गुंफिलें जाण्यास फारशी संधी राहिली नाहीं. उलट तो संस्कृत साहित्यांत इतर कवींची ऐतिहासिक माहिती ठरविण्याचा एक अत्यंत खंबीर असा आधार झाला आहे.





अनुक्रमणिका

# कहाणी माझी दुधाची साय

— वामन चोरघडे

*दीपावलीच्या जूनच्या विश्वकथा अंकांत कांहीं जागतिक वाङ्मयांतील कथा प्रसिद्ध केल्या आहेत. त्या कथांच्या पार्श्वभूमीवर एका सिद्धहस्त मराठी लेखकाची जुन्या थाटाची, जुन्या वळणाची ही खास वेगळी अशी नवी कथा.*



ऐका माझ्या भावांनो ! ऐका माझ्या बहिणींनो !
कहाणी माझी गुणाची, मीठ मिरची चुनाची !

कहाणी ऐका थाटांत; पाणी येईल पाटांत; अन्न पडेल ताटांत, हंसूं फुटेल ओठांत !

कहाणी कोणाची ? कहाणी सोमा गोमाची; कहाणी माणसाची; शेतांतल्या कणसाची; उसाच्या मळ्याची; शपथ तुमच्या गळ्याची !

कहाणी घडली कुठें ? नदीचा पाट होता तिथें. एक होतें आटनगर. एक होतें पाटनगर. गांव एक पण नांवें दोन ! पाटाच्या खालचें वलिताचें तें पाटनगर; पाटाच्या वरचें कोरड्याचें तें आटनगर ! गांवाची जमीन काळीभोर पाहून नाचे मनांतला मोर. कहाणी जुन्या वेषाची पण आहे आपल्या या मराठी देशाची !

आटपाटनगर. तिथें एक होती बुढी ! ती गेली कुपा कुपा; तिला सांपडला एक ढबू, दुंडा पैसा ! आतां माय करूं काय ? ढबूचें या घेऊं काय ?

कहाणी ऐका बुढीची, कहाणी ऐका ढबूची, कहाणी देवाची, कहाणी देवाच्या जीवाची ! कहाणी वावराची, कहाणी शिवाराची !

सावधान सावधान, ढळूं नका देऊं ध्यान; उतूं नका, मातूं नका; घेतला वसा टाकूं नका. मधून उठून जाऊं नका; खोकला येतो असा असा पण तुम्ही आपले ताठ बसा !

बायको बोलावते जाऊं नका; गोड गोड बोलते फसूं नका आणि माझ्या गे बहिणींनो ! नवऱ्यांवर आपल्या कधीं रुसूं नका !

ऐका ऐका सांगतों काय ? कहाणी माझी दुधाची साय !

एक होती बुढी, ती गेली कुपा कुपा, तिला सांपडला पैसा. आतां माय करूं काय ? ढबूचें या घेऊं काय ?

म्हातारीला विचार पडला. भातकें घ्यावें तर भूक नाहीं. फुटाणें घ्यावें तर चावत नाहीं; कोणाला द्यावें तर भावत नाहीं; आरसा घ्यावा तर दिसत नाहीं अन् दांडखड घेतलें तरी रांडलेक कुणी पुसत नाहीं !

म्हातारीनें पैसा उचलला. गांवची मुलें तिच्या मागें लागलीं. बुढे बुढे, पैशाचे फुटाणे घे. तूं खा, आम्हांला दे ! गांवच्या मुली मागें लागल्या–बुढे बुढे, आरसा घे, आमचें रूपडें त्यांत पाहूं दे !

म्हातारी म्हणाली–' हा लेकांनो ! दूर व्हा, पैशाला माझ्या मोठें मोल; फुका खरचलें तर येईल बोल ! '

म्हातारी विचारांत पडली. सांपडलेला पैसा तिनें पोटीं खोचला, ' कसें करूं काय करूं, कोणाला वरें मी विचारूं ! ' असें म्हणत बुढी गांवातल्या मारुतीच्या देवळाकडे निघाली.

इकडे काय घडलें ?

मारोतीचा पार, तिथें दिसली गर्दी फार. मुलें ओरडत होतीं. कुत्रीं केंकाटत होतीं, दिसेल तिथून दगड उचलून पाराच्या बाजूला फेकत होतीं.

पाराच्या खालीं कोण होतें ?

एक होता माणूस. वीस बावीस वर्षांचा, फाटक्या आंगाचा, वाढल्या केसाचा, चिपडया डोळयाचा, तुटल्या ओठाचा ! हात त्याचे रोड रोड, पायाला त्याच्या फोडच फोड ! अंगावर धडोते नाहीं, एक चांगलें कुडतें नाहीं !

मुलें ओरडत होतीं–' वेडा रे वेडा, त्याला खालीं ओढा, रडतो कसा खोटा खोटा; बसतो कुठे गोटां गोटां ! '

तो माणूस हात जोडत होता, मुलांना म्हणत होता–'नका रे नका मला मारूं नका, उगाच मरून जाईन फुका ! मी नाहीं वेडा. माझा नाद सोडा ! '

मुलें ऐकेनात, ओरडायचें थांबेनात !

तितक्यांत आली बुढी, पावलें टाकत थोडी थोडी. तिनें तो माणूस पाहिला, तिच्या मनांत द्रव आला ! ' ए पोरट्यांनो, व्हा बाजूला ! देईन एक रट्टा काठीचा, कणा मोडेल पाठीचा ! '

पण मुलें म्हातारीला आटोपेनात; आपला नाद सोडीनात; म्हातारी भ्याली, ' अगे माय करूं काय ! धावरे बापा मारुतीराय ! '

बुढी तरा तरा निघाली. गांवच्या पाटलाकडे गेली. पाटीलबाबा उठा उठा, चला चला तिकडे माजला गलबला ! तिथें बसला माणूस बघा, जिता होता मघा मघा ! तुम्ही करा जरा घाई, नाहींतर तें लेकरूं कांहीं वाचत नाहीं ! '

पाटलानें मुंडासें बांधलें, काठी घेतली. ' चल चल म्हातारे दाखव मला, पाटलाचा न्याय भला भला ! '

पाटील पारावर आला. त्यानें तो प्रकार पाहिला, मुलांनी पोबारा केला. पाटील त्या माणसाकडे गेला. '

तो बिचारा माणूस घाबरून, अर्धमेला होऊन, गुढघ्यांत मान घालून रडत होता. त्याच्या डोक्यांतून रक्त वहात होतें. पाटील म्हणाला–' कोण रे तूं ? ' माणसानें वर पाहिलें. पाटलाला बघून तो रडूं लागला. विनवूं लागला—'नका दादा, नका दादा; मला आणखी मारूं नका. मी वेडा नाहीं ! '

पाटील म्हणाला—' अरे तूं कोण ? नांव सांग. गांव सांग; आला कसा, जाशील कसा ? आला कुठून, जातोस कुठें ? '

म्हातारी म्हणाली—' भिऊं नकोस लेकरा ! अरे, हा आपला पाटील बाबा ! आतां तुला कुणी कांहीं करणार नाहीं; आता तुला कुणी मारणार नाहीं ! '

पाटील म्हणाला—' खरें रे गड्या ! आता तुला कुणी मारणार नाहीं. कुणी तुला दाखवील बोट, तर त्याचें मी फोडीन पोट ! कुणी तुला जर दाखवील डोळा, तर त्याचा करीन मी चोळामोळा ! '

त्या माणसाला धीर आला. तो पाटलाच्या पाया पडला. म्हातारीचे त्याने पाय धरले. तो म्हणाला—' सांगतों माय सगळें सांगतों. पण मला कुणी विहीर दाखवा. घोटभर पाणी पितो, जगलों वाचलों तर सगळं सांगतों. चार दिवस झाले म्हणा, पोटांत माझ्या नाही दाणा; मारानं मोडला कणा कणा ! '

पाटलाला त्याची दया आली. त्याने गुरवाला हांक मारली—' गुरवा गुरवा, इकडे ये, लोटा भरून घेऊन ये. ' लगाबगा म्हातारी गेली. पैशाचें फुटाणें घेऊन आली—' ये रे लेकरा बैस असा, पाण्याने ओला कर घसा ! मुठभर चणे खा, घोटभर पाणी पी; तुला येईल बळ मग आपल्या कहाणीकडे वळ ! '

त्या माणसाने मूठभर चणे खाल्ले, घोटभर पाणी प्याला. आपली कहाणी तो सांगूं लागला—' पाटीलबाबा, बुढीमाय, कर्माची कथा सांगूं काय ? हें आट–नगर नव्हे काय ? पाटांत वाहते पाणीच पाणी, पण माझी कथा बापुडवाणी ! माझं नांव सोमा, माझा बाप रामा, माझा धंदा शेती पण माझी झाली माती माती ! पाटीलबाबा, मी तुमच्या या गांवचा. माझा चुलता या इथें राहातो विठ्ठल नांवाचा. वर्षं झाले दोन इसा. माझ्या चुलत्याला तुम्ही पुसा ! माझा बाप इथे राहात होता, खात होता पीत होता, घरची जमीन कसत होता. पण त्याचं नशीब फिरलं. तो घरांतून पळून गेला. शहराचा त्यानं आसरा केला. पाटाची बायको करून संसार केला पण भूक भूक करून गेला ! मी होतों वर्षांचा पांच, मायला माझ्या भुकेचा जाच ! बाप मेल्यावर ती कशीबशी जगली आणि मला आठ वर्षांचा टाकून मरून गेली. मी राहिलों एकटा, तहान लागली पाणी प्यावं, भूक लागली रडून घ्यावं. तुकडा पाणी मिळालं तर खावं नाहींतर सांदी कोपऱ्यांत झोपून जावं.'

' पाटीलबाबा, हाल फार झाले; कसातरी दिवस कले. महिन्यामागे महिना जाई. मी कसा तरी जगत राही !

' बारा वर्षांचा झालों. मला थोडें समजूं लागलें. भाकर तुकड्यावर काम करूं लागलों. आला दिवस ढकलूं लागलों. मनाजोगं काम मिळेना. पोटभर अन्न मिळेना. लोक म्हणत—'बापखाया, याचं तोंड पाहूं नये.' असाच रहात होतो. मरत नव्हतों म्हणून जगत होतो. '

' एक दिवस एक म्हातारा भेटला. तो म्हणाला—' पोरा पोरा, अरे तूं कोण, कुणाचा ? आटगांवच्या रामाचा कीं पाटगांवच्या








विठोबाचा ? तुझा वाण बापावाणी इथे काय करतो चिखलपाणी ! जा आपल्या गांवाला भेट आपल्या चुलत्याला.'

'म्हाताऱ्याने ओळख पटवली. आटगांवाची खूण दाखविली. माझी भिकाऱ्याची आस फुलली. विचार केला, आटगांवीं जावं चुलत्याच्या पायां पडावं. म्हणावं—काका काका, मला जवळ घे. लहानसा जमिनीचा तुकडा दे. कष्ट करीन शेत पिकवीन. पायलीभर लाखाची, तांब्याभर ताकाची सोय करीन. आपल्या कष्टाचं जिणं जगेन आणि देवाचा कागद येईल तेव्हां हक्काच्या जमिनीची चादर अंगावर घेऊन झोपून जाईन.

'पाटीलबाबा, असा मनीं विचार आला, म्हणून हा गांव मी जवळ केला. चालून चालून दुखले पाय देवाच्या पाराचा केला ठाय ! अन्न नाहीं वस्त्र नाहीं, घर नाहीं, दार नाहीं, पाटीलबाबा, धरतो पाय माझा करून द्यावा न्याय !'

पाटीलबाबाने त्या माणसाची कथा ऐकली. त्याला दया आली. त्याच्या मनांत आलें की, आपल्या गांवचा जीव, त्याची अशी गति होऊं नये. आपण गांवचे पाटील, गांव म्हणजे आपलें लेकरूं, गांवाला राखलें पाहिजे; देवाला ओळखलें पाहिजे !

पण पाटलाला सोमाचा बाप जो रामा तो आठवेना. पाटील नवा होता. जुना पाटील आला नव्हता. शेवटी पाटलाने सोमाचा काका विठोबा त्याला बोलावणें धाडलें. विठोबा आला. पाटील म्हणाला—अरे इठला, हा आला सोमा. म्हणतो माझा बाप रामा माझा चुलता इठोबा तूं याला जाणतो का ?'

विठोबाने विचार केला. त्याला आठवेना. तो म्हणाला—'पाटीलबाबा मला नाही याद. मी लहान होतों. बुढा माजा म्हणत होता, एक लेक रामा, येईना कोणत्या कामा ! घर टाकून पळाला तो, जगला वांचला कोण जाणतो ? वर्षं झालीं फार, विसरून गेलों सगळं पार ! रामाचा मुलगा कसा ओळखूं ? नांव गांव कसं पारखूं ? असेल कुणी भाट भिकारी, त्यांची असते असलीच परी ! सांगतील आपलं कांहीबाही, कोण कधीं फसेल नेम नाही.'

सोमा म्हणाला, काका काका, पाहून घे; चेहऱ्याची खूण पटवून घे. माझा बाप रामा, त्याचा मी लेक सोमा. मी भाट नाहीं, मी भिकारी नाहीं. मला आहे अन्नाची वाण पण खरं सांगतों देवाची आण.

पण पाटील म्हणाला,— 'गड्या सोमा, विठोबा म्हणतो तें खरं आहे. रामाचा सोमा तूंच हें खरं कसं मानावं ? तूं असं कर; हे पांच रुपये घे. आपल्या जन्मगांवीं जा. तुझ्या जन्माचा दाखला घेऊन ये. मग कांहींतरी न्याय करूं.'

सोमानें सगळयाना नमस्कार केला. म्हातारी बसली होती तिच्याकडे तो गेला—'बुढे बुढे तूं माझी अन्नाची माय, माझा दुवा घेऊन जाय.'

सोमा परत गेला. त्याला पुष्कळ धीर आला, कधीं नव्हे ते त्याच्याजवळ पांच रुपये होते. गांवच्या पाटलानें दिलें होते. पांच रुपयांत दुनिया विकत घ्यायची त्याला हिंमत आली. त्याला एक अन्नाची माय मिळाली. गांवच्या पाटलाची दया मिळाली. त्याच्या काकाची भेट झाली. आपण एकटे नाहीं, आपल्या मागे लोक आहेत. आपण भिकारी नाहीं, आपल्याजवळ पांच रुपये आहेत. पांचामुखी परमेश्वर तर पांचा रुपयीं दुनिया !

सोमा परत निघाला. त्याच्या हातापायांत जोर आला. त्याच्या मनाला हुरूप वाटला. वाड्यामागून वाड्या, शेतामागून शेतें, चावड्या मागून चावड्या मागे टाकीत तो आपल्या जन्मगांवीं पोंचला. पदरचा त्यानें टका सोडला, चेहरामोहरा नीट केला. भाकर तुकडा पोटांत घातला. चारचौघांसारखा रुबाब केला. चावडीच्या पाटलाला जाऊन भेटला. चारदोन हेलपाटे कामी आले. चार दोन टक्के खर्ची पडले पण त्याला जन्मदाखला मिळाला. त्याचा बाप रामा, पोराचें नांव सोमा. त्याची माय सोनी, सोमा हरखला मनीं !

दाखला मिळाला. सोमा परत पाटगांवला निघाला. त्याच्या पायाला घारीचे पंख लागलें. त्याच्या हातांत हत्तीचें बळ आलें !

सोमा आला सोमा आला. मारोतीचा पार त्याने जवळ केला. बुढीमायला हाका दिला. पाटलाला त्याने नमस्कार केला. 'पाटील-बाबा, दाखला माझा पाहून घ्या. काकाला माझ्या नेऊन द्या.'

पाटलाने विठोबाला बोलावलें–'गड्या विठोबा, हा दाखला घे. तूं नेकीचा माणूस. मीं न्याय करतों. सोमाला एक लहान तुकडा दे. तुझा भाऊ त्याचा बाप, सोमाला दे मापांतलं माप ! तूं जें देशील तें खरं. सोमाचं होईल बरं ! त्याला डाळपाण्याचा आसरा होईल. त्याचं सगळं बरं होईल. रक्ताला रक्त जवळ करील. सोमाचा हात नांगर धरील. देव तुझं बरं करील.'

विठोबाने पाटलाला मोडता घातला नाहीं. आपल्या मनांत पाप येऊं दिलें नाही. तो सोमाला म्हणाला—'सोमा, खुशीनं देतो तें तूं घे. माझं लेकराबाळाचं घर, तुझा एकटा जीव. तुला वीतभर जमीन पुरे, माझ्यासाठीं हातभर उरे !'

पाटील मनांत सुखी झाला. गुण्यागोविंदाने निकाल लागला. सोमाने आपल्या चुलत्याचें म्हणणें मान्य केलें. कधी नव्हे ती त्याला आपली म्हणायला जमीन मिळाली. हक्काच्या भाकरीची सोय झाली. काकाची मात्र मिळाली. कष्टाची हाव बळावली !

सोमा आपल्या तीनचार एकरांच्या पट्टीवर रहायला गेला. झाडाच्या चार डहाळ्या तोडून त्यानें एक झोंपडें उभारलें. पाटला-कडून, काकाकडून भांडीबासनें जमा केलीं. पहिल्या दिसाची भाकर त्याला गोड गोड लागली. हकाची भाकर नेमाने, तिला चव घामाने !

अडीअडचणीला पाटीलबाबाचे पाय धरावे, काकाचें घर जवळ करावें, अशा क्रमानें सोमा शेतांत राबूं लागला. खणखाण कुदळी मण मण माती, सोमाच्या शेतांत माणिक मोती !

उन्हाळा आला जमीन तापली, पावसाळा आला पिकें वापली. दसरा आला जोंधळयानें त्याला सलाम केला. दिवाळी आली, सोमाची आस उजळून गेली. दाणा आला मण मण, सोमाचा फुलला कण ! त्यानें कणगी बांधली. पाटलाची बाकी चुकवून दिली. लोकांची भांडीबासनें परत केलीं. पाटलाचे पांच रुपये हळदकुंकू लावून त्याच्या पायावर ठेवले–'पाटीलबाबा, हे पैसे घ्या. तुमची दया अशीच असूं द्या.'

सगळयांचें देणं देऊन झालें. एक ऋण राहिलें. मरतापोटी म्हातारीचे चणे त्याच्या कामीं आले होते. तो म्हातारीकडे गेला. म्हणाला—'माय माय, मी तुझा लेक. मला जवळ कर. तुला लेक नाहीं, मला माय नाहीं, तूं माझ्या झोंपडींत चल. भाकर तुकड्याला वाण नाहीं. माझा हात तुझ्या पायावर. तुझा हात माझ्या पाठीवर.'

अनुक्रमणिका






म्हातारी कबूल झाली. सोमाजवळ राहूं लागली. भाकरं तुकडा करूं लागली. सोमाला जेवूं घालूं लागली. गाईला चारा देऊं लागली. तुळशीजवळ वात लावूं लागली. अंगणांत तुळस, गोठ्यांत गाय, देवा देवा पाहून जाय ! सोमा नाहीं भिकारी, तो झाला आतां शेतकरी ! त्याचें अंग भरूं लागलें. त्याचें दुःख सरूं लागलें. शेतांतलें धान्य पुरूं लागलें. खाऊनपिऊन उरूं लागलें. पेरलें तें उगवूं लागलें. आणि त्याची कणगी फुगवूं लागलें. दाळदाणा पुरेपूर, सोमाचा आतां पालटला नूर !

त्याच्या तोंडावर आली कळा, त्याला शेतीचा लागला लळा ! डोळे त्याचे चमकूं लागले. ओठ त्याचा फाटला होता पण सोमाचा नूर आतां पालटला होता !

दुसऱ्या सालाचा दसरा आला. सोमा सोनें घेऊन आला. पहिलें पान देवाला. दुसरें पान तुळशीला, तिसरें पान गाईला. चवथें मायच्या पायावर. पांचवें पाटलाच्या माथ्यावर. काका काका उभा राहा. तुझ्या पुतण्याचें कौतुक पहा. यारे माझ्या भावांनो या सोमाच्या खिशांतला खाऊ घ्या.

एक दिवस सोमा संध्याकाळीं घरी आला भाकरी खाऊन म्हातारीजवळ बसला. तिला म्हणाला—' माय, तूं होती म्हणून मी वाचलों. तूं होती म्हणून मी जगलों. तुझ्या पैशाचं मोल नाही. त्याचा कुठं तोल नाही. तूं पैसा माझ्याकारणीं लावला. हा तुझा पैसा घे. त्याचा कांही तरी उपाय कर.' म्हातारी म्हणाली—' लेकरा, अरे येडा की काय तूं ? अरे तो पैसा पेरला त्याचंच हें सगळं झालं.' सोमा म्हणाला—' मायं म्हंणूनच उगवलेल्या कणसाचं बीं तुला देतो.' म्हातारी म्हणाली, ' हात् रांडलेका, तूं मोठा इब्लीस ! तूं काय माझं ऐकतोस. ओटतुट्या, पैसा देतो तर टाक त्या गाडग्यांत.'

सोमानें गाडग्यांत म्हातारीचा पैसा टाकला, आणि रोज नेमाने देवावर पाणी घालतों, तुळसीला दिवा दाखवतों तसा तो त्या गाडग्यांत म्हातारीच्या नांवाने पैसा टाकूं लागला. पैसा गाडग्यांत पडतो कसा, सोमाने घेतला म्हातारीचा वसा !

सालोसालचा दसरा आला. सोमानें गाडग्यांत पैसा टाकला. गाडगें गेलें भरून. सोमा निघाला घरून, त्याने दुसरें गाडगें आणलें, पहिल्या गाडग्यावर ठेवलें. दुसरें गाडगें भरून गेलें, तिसरें त्याच्यावरतीं चढलें, एकावर एक गाडग्यांची हारी, सोमा नि म्हातारी हरखलीं भारीं !

सोमाला दिवस बरा आला. सोमा उतला नाहीं, मातला नाहीं. कष्ट करून थकला नाहीं. पाटलाचे उपकार विसरला नाहीं. भल्या वाटेवर घसरला नाहीं. सकाळी देवाचें नांव दुपारी कष्टाला वाव. दिवस कलल्या बुद्धीची माव !

एक दिवस संध्याकाळीं सोमाला पाटलाची हाक ऐकूं आली. ' सोमा सोमा. आहे कारे घरीं ' सोमा धावला. पाटलाला घेऊन आला. गोठ्याकडे पाहून तो म्हणाला, ' अरे माझ्या वासरांनो, माझा बाप घरीं आला. तुळशीबाई तुझी कृपा झाली. बापाची काठीं माझ्या दारीं वाजली. सोमाने डोईचें मुंडासें सोडलें. जमिनीवर आंथरून पाटलाला त्यावर बसविलें. पाटील म्हणाला — ' का गा सोमा, बेस आहे ? का गे बुडगे, जिती आहेस ? ' अरे सोमा, ढोरें वासरें तुझ्या घरीं किती आहेत ? '

सोमाने सगळें सांगितलें. पाटील म्हणाला-- ' पोरा, तुझ्या घामानं तूं आपलं भलं केलंस पण गड्या रे, एक बात माझ्या मनांत खटकते. माझ्या ध्यानीं आलं पण इलाज नव्हता, उपाय नव्हता. तुला विठोबानं जमीन दिली. पण ती कोरडी. पाटाचं पाणी आटगांवच्या माथ्यावर येत नाहीं. ' सोमा म्हणाला– ' पाटीलबाबाजी, मला त्याचं दुःख नाहीं, पोटाला अन्न आहे, गाईला चारा आहे, दारांत तुळस आहे आणि तुमची सावली आहे. '

पाटील म्हणाला, अरे असं नाही सोमा माझं ऐक. माणसानं कष्ट करतां थकू नये. पण आपल्या भल्याला चुकू नये. एकाचे दोन करावे, दोनाचे चार करावे. आपलं इमान मोडूं नये पण कष्टाला कमी पडूं नये. दिवस आहे वेळ आहे. माझं ऐक. अरे आता काळ बदलला. माणसं बदललीं. शेतीला मोल आलं. काल गांवांत एक साहेब आला होता. माझ्याच धडीवर उतरला होता. त्यानं सांगितलं कीं, पाटीलबाबा कष्ट करणाऱ्याला आम्ही मदत करतो. तुम्ही दोन पैसे लावा आम्ही दोन पैसे देऊं. मी त्या साहेबाला सीधाच बोललों. साहेबा साहेबा, माझा एक लेक आहे. त्याचं नांव सोमा पण त्याच्या शेतांत पाणी नाहीं वलिताची सोय नाही. काय करावं, आमची अक्कल चालत नाही ! साहेब म्हणाला, पाटीलबाबा सोमाला बोलवा त्याला म्हणावं तूं एंजिन घे. अर्धे पैसे तूं दे अर्ध्याची सोय सरकार करील. सोमा असले तर दोनशे रुपये काढ, एंजिन घे. शेतांत पाण्याची सोय होईल काळी आई दुवा देईल.

( पान ५४ वर )




## शालिनतेचा आदर्श

कु. शैला यांस,

स. न. वि. वि.

शालीनता, साध्वीपणा हा मनाचा धर्म आहे. पुरुषांना प्रक्षोभ आणणारें सौंदर्य हें देहाचें सौंदर्य होय. देह आणि मन यांत संवाद असतोच असें नाहीं. कुरूप स्त्रियांचें मन सुंदर असूं शकतें. सुंदर स्त्रियांचें मन कुरूप असूं शकतें. त्याचप्रमाणें पुरुषांना वेड लावणारें देह सौंदर्य असणारी शामा आपली नजरही वर न उचलण्याएवढी वृत्तीनें सदाचारणी असुं शकते. उलट जिच्याकडे कुणी पाहूं शकत नाहीं अशी कुरूप स्त्री आपल्या विभ्रमांनीं पुरुषांना भुलवूं शकते. सुंदर स्त्रीच्या देहाचा प्रक्षोभक उठाव हें प्रबल आकर्षण असतें. हें आकर्षण दुर्जनांवर पडलें म्हणजे, ती स्त्रीही दुर्जन असेल तर व्यभिचाराला अवसर मिळतो. स्त्री सुजन असेल तर बलात्काराला अवसर मिळतो. हें आकर्षण सुजनांवर पडलें तर ती स्त्री दुर्जन असल्यास सज्जन तिकडे दुर्लक्ष करतात. पण ती स्त्री जर सुजन असेल तर देहाच्या आकर्षणांत मनाच्या ओढीची भर पडून या ओढीचें उदात्तीभवन विश्वविजयी सामर्थ्यांत होतें. द्रौपदीची मोहिनी जयद्रथ, कीचक इत्यादी पापी लोकांवर पडली तेंव्हां बलात्काराचा प्रसंग ओढवला. हीच मोहिनी कृष्णावर पडली तेंव्हां ईश्वरी सामर्थ्याचा उदय झाला. द्रौपदी ही भारताची आणि कृष्णाची शक्ति होय. तिचें सौजन्य आणि कृष्णाचें सौजन्य यांचा अमाप स्नेह हेंच भारतांतले सौंदर्य होय. द्रौपदीचें आकर्षक देहसौंदर्य ही तिला निसर्गाची देणगी होती. पण म्हणून त्याच निसर्गानें तिला जें शालीन मन दुसऱ्या देणगीच्या रूपानें दिलें होतें त्यास बाध यावयाचें कारण नव्हतें. माझ्यामतें हें स्पष्ट असल्यानें याच्वा खुलासा केलेला नव्हता। द्रौपदीच्या पातिव्रत्याबद्दल आपल्या मनांत माझ्या लिखाणामुळें बिलकूल किंतू उत्पन्न होता कामा नये. शालीनतेचा आपला जो आदर्श असेल तेवढी द्रौपदी शालीन आणि सुशील होती यांत संशय नसावा ही विनंती.

आपला नम्र,

**आत्माराम नीलकंठ**

## थक्क झालों

स. न. वि. वि.

दीपावलीचा जूनचा अंक आत्ताच मिळाला. मी मराठींतील नवकथेचा नेटानें अभ्यास केलेला नाहीं. त्याला मुख्य कारण म्हणजे या कथा वाङ्मयांतून जो एक विकृत लैंगिकतेचा जोमदार प्रवाह वाहत असतो तो मला वास्तव तर वाटत नाहींच पण मनोहरही वाटत नाहीं. ही लैंगिकता न आवडणें हा बुरसलेपणा आहे असाही पद्धतशीर कांगावा विद्वान साहित्य समीक्षक करीत असतात. त्यामुळें नवकथेची रुची घेणें हा माझ्यासारख्या अविद्वानाचा प्रांत नव्हे असें माझ्यासारख्या सामान्य माणसास वाटणें सहाजिकच आहे.

त्यामुळें आपला विश्वकथा अंक माझ्या प्रतिक्षेचा विषय झाला होता. आपण सारें विश्व धुंडून या कथा निवडल्या त्यांत आपणास थोडीही विकृत लैंगिकता मिळूं नये याचें नवल वाटतें. कदाचित विश्व वाङ्मय हें मराठी वांङ्मयाच्या फारच मागें आहे असा याचा अर्थ लावावयाचा काय ? की मराठी कथा वाङ्मय हें दरिद्री सिंगल रूमच्या अवास्तव जीवनांत अनैसर्गिक कोंडमाऱ्यामुळें गुदमरून विकृतीच्या पंथास लागलें आहे असें मानावयाचें ? तें कांहीं असो. लैंगिकतेचा घोष म्हणजेच प्रगती असें विश्वांतील कथाकार अजून मानत नाहींत हें पाहून फार दिलासा वाटला.

श्री. दत्ता कदम यानीं अनुवादलेली कथा नितांत रमणीय आहे. श्री. भोवे, ठाकूर यांच्याही गोष्टी छान आहेत. मी या तिन्ही गोष्टी पूर्वी मुळांत वाचलेल्या असल्यानें त्यांच्या पुनः परिचयाच्यावेळीं वेगळाच आनंद वाटला.

या सर्वांहूनही विशेष आवडली ती श्री. रेगे यांची कविता. नवसाहित्यांतील प्रक्रिया की काय म्हणतात त्यांचें चरचरित दर्शन या कवितेंत घडून सुंदर गुदगुल्या होतात.

मुखपृष्ठाबद्दल नेहमी नेहमीं काय लिहावयाचें ? पण कानांतील डूल ओठाकडे लोंबलेले असावयास हवें होते असें वाटतें. चूक असेल तर क्षमा करावी.

आपला,

**आनंद साधले मुंबई**

## रसाळ अंक

स. न. वि. वि.

दीपावलीचा जूनचा 'विश्वकथा' अंक वाचला. स्वित्झरलंड, थायलंड, ब्रह्मदेश, जपान, तुर्कस्थान, हंगेरी, चीन, इटाली, आफ्रिका या वेगवेगळ्या देशांतील ख्यातनाम कथाकारांच्या सर्वश्री सदानंद रेगे, शा. नि. ओक, श्रीकृष्ण ठाकूर, प्रेमानंद वळवईकर, रंगनाथ कुळकर्णी, गोपालकृष्ण भोबे, दत्ता कदम, शां. श. रेगे व सदानंद चेंदवणकर यांनीं अनुवादित केलेल्या कथा आपण मराठी वाचकांसमोर 'विश्वकथा' विशेषांकाच्या स्वरुपांत ठेवून एक महान् कार्य केलें आहे. अशा प्रकारचा प्रयत्न करण्यांत आपण प्रथम स्थान मिळवावे हें आपल्या विविधपैली कल्पकतेला शोभूनच दिसतें. त्याबद्दल आपलें मनःपूर्वक अभिनंदन.

अनुवादाच्या दृष्टीनें पाहिल्यास या विशेषांकातील सर्वच कथा आपण निर्देश केल्याप्रमाणें 'सरस, सुरस, सुंदर, समर्पक व रसाळ' अशा आहेत. नवोदित लेखकांपैकीं सी. प्रेमानंद वळवईकर, दत्ता कदम यांचा मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो. 'स्फूर्तीची फुलें' नेहमीप्रमाणें ताजी व टवटवीत आहेत.

'दीपावलीच्या' क्रिकेट, महाराष्ट्र-महोत्सव, भाषाभारती, क्रांतिसंस्मरण व मुक्तगोमंतक या गतविशेषांकाच्या कीर्तींत भर घालील असाच हा सध्यांचा 'विश्वकथा' अंक काढल्याबद्दल आपले पुनः एकदां अभिनंदन.

आपला,

**वसंत पी. पाटील, बी. ए. मुंबई**






अनुक्रमणिका










*हंगचौ शहरांत घडलेली ही लग्नाची मनोरंजक भानगड. 'सिंग शिह' या १७ व्या शतकांतील लेखकाची त्या काळांत गाजलेली ही कथा. आणि श्री. शामराव निळकंठ ओक यांनीं केलेला तिचा सुरम्य अनुवाद......*

अनंत कालापासून लग्नें स्वर्गांत आगाऊ ठरत आलीं आहेत. दैवाची इच्छा असेल तर एकमेकांपासून शेंकडो कोस दूर राहणारीं माणसें एकत्र येतात—आणि शेजारी शेजाऱ्यांना मात्र एकमेकांचें कधीं मुखदर्शनहि होत नाहीं. सर्व कांहीं जन्माआधीं ठरतें, आणि मानवाचा प्रत्येक प्रयत्न केवळ दैवाची आज्ञा अमलांत आणीत असतो. या पुढच्या गोष्टीवरून तें शाबित होतें.

सुंग वंशाच्या चिंग यू जमान्यात हंगचौ येथें लिउ नांवाचा एक पंडित राहात असे. त्याला एक मुलगा व एक मुलगी अशीं अपत्यें होतीं. मुलगा रत्नकुमार सोळाच वर्षांचा होता व त्याचा वाङनिश्चय सुन घराण्यांतल्या मुक्ता नांवाच्या मुलीशीं झाला होता. विद्याभ्यासांत रत्नकुमार हुषार होता व तो पुढें साहित्याच्या थोर श्रेणीला पोहोचेल व मान्यता मिळवील अशा अपेक्षा त्याने निर्माण केल्या होत्या. त्याची बहिण विवेकिनी ही पंधरा वर्षांची होती व तिचाहि गांवातल्याच पेइ नांवाच्या औषध व्यापाऱ्याच्या मुलाशीं साखरपुडा झाला होता. तिच्या रेखीव भुवया कमानदार होत्या आणि डोळ्यांत एक मोहक झांक होती. तिचा लवलवता बांधा पाहणाराच्या मनांत चलबिचल उत्पन्न करणारा होता. तिचा चेहरा फुलासारखा नितळ होता आणि तिची चाल झोके घेत उडणाऱ्या चिमण्यांची आठवण करून देई.

विवेकिनीचें लग्न ठरविण्यांत मध्यस्थी करणाऱ्या बाईला पेइ कुटुंबानें एक दिवस मुलीघरीं पाठवलें व लग्नाची तिथी लौकरची ठरवावी असा निरोप कळवला. पण लिउला मुलाचें लग्न आधीं व्हायला हवें होतें, आणि त्या लग्नाची तयारी सुरू करून त्यानें तिथीहि निश्चित केली. तथापि तो दिवस जवळ आला तेव्हां रत्नकुमार अत्यवस्थ आजारी पडला. बाप लिउ लग्नाची तिथी पुढें ढकलावी म्हणत होता, पण मुलाच्या आईनें वाद केला कीं लग्नाच्या आनंदानें सुधारेल मुलाची प्रकृति. 'आणि दुर्दैवानें मुलाचें कांहीं बरेंवाईट झालें तर ?' लिउनें विचारलें, 'तर आपण मुलीला साऱ्या हुंड्यानिशी आणि मानपान करणीसकट तिच्या माहेरीं परत पोहोचवू' बाई म्हणाली,





अनुक्रमणिका

बऱ्याचशा पंडितांप्रमाणें लिउ बायकोपुढें नरम पडणारा होता. तेव्हां आतांहि तिच्या इच्छेप्रमाणेंच झालें.

पण काय झालें, त्यांच्या एका शेजाऱ्याचा यांच्याकडून एकदां अपमान झाला होता व तो विसरला नव्हता. त्याला रत्नकुमारच्या आजाराची कुणकुण लागतांच त्यानें जाऊन सुन कुटुंबाला खबर दिली.

सुनला आपल्या मुलीच्या भवितव्याशीं खेळ व्हायला नको होता. हें लग्न जुळवणाऱ्या मध्यस्थी बाईला त्यानें बोलावून घेतलें आणि तिची उलट तपासणी सुरू केली. ती बावचळून गेली, दोघांपैकीं कोणत्याच घराला दुखवायला तिला नको होतें. काय करावें हें तिला सुचेना, लिउचा मुलगा आजारी आहे हे तिनें कबूल केलें आणि लग-बगीनें लिऊच्या घरीं जाऊन मुलगा बरा होईपर्यंत लग्नाची तिथी तहकूब करावी असें सुचवलें, कारण नवऱ्या मुलाची प्रकृति कशी आहे तें पाहायला सुन आपली एक म्हतारी दाई पाठवणार होता.

काय करावें हें लिउला सुचेना. त्यानें कांहीं ठरविण्याच्या आंतच ती दाई येऊन दाखल झाली. तिला बसायला सांगून तो मध्यस्थ बाईला म्हणाला, मीं जाऊन आमच्या कडकाबाईना घेऊन येतो. आंत जाऊन त्यानें बायकोला थोडक्यांत काय होत होतें तें सांगितलें.

'मीं तुला म्हणत होतों तिथी पुढें ढकलावी, आतां ती म्हातारी बाहेर येऊन बसली तिला काय सांगू ?'

'टाकाऊ माल आहांत तुम्हीं !' बायको म्हणाली. वाङ्निश्चय झालेला आहे. त्यांची मुलगी आपली सून झाली आहे. पहा तुम्हीं आतां'

तिनें विवेकिनीला सांगितलें कीं, 'दिवाणखान्यांत व्याह्यांकडे पाठवायचें सारें रूखवतं मांडून ठेव, आणि स्वतः बाहेर येऊन तिनें त्यां म्हातारीला विचारलें, 'सूनबाईच्या आईकडून कांहीं निरोप आणला आहे ?'

'आपल्या चिरंजिवांच्या तब्येतीबद्दल त्याना काळजी वाटत आहे, आणि त्यांना बघण्यासाठीं मला पाठवलें आहे. प्रकृति अत्यवस्थ असली तर लग्नाची तिथी पुढें ढकलावी असें त्यांना वाटलें'

'त्यांना काळजी वाटते हें ऐकून मला धन्यता वाटली. मुलाला थोडा सरदी ताप आहे, पण आजारी असा नाहीं. पुढची तिथी पाह-ण्याची गोष्टच निघत नाहीं, सगळी तयारी पूर्ण झाली आहे आणि आतां बेत तहकूब केला तर फार नुकसान होईल. पुन्हां उल्हास वाटला म्हणजे आजारीपण राहणार नाहीं. आमंत्रणें सगळीकडे रवाना झालीं. आहेत– तुमच्या बाजू-नेंच कांहीं विचार बदलला कीं काय ?'

'निदान जांवईबुवांना एकदां पहायला मिळेल का !'

'त्याला नुकतंच औषध देऊन निजवला आहे. आणि त्याला नुसतं पडसं झालं आहे हें मीं सांगितलं ? माझं खरंखोटं करून माझा अपमान करायचा आहे ?'

'असें असेल तर मला परत जाण्याशिवाय कांहीं उरलें नाहीं.

'असें जाउं नका. चहादेखील घेतला नाहींत, दिवाणखान्यांत जाऊं, इथें फार सामान पसरलें आहे.'

दाईनें नवरानवरीचा महाल हौसेनें शृंगारलेला पाहिला. लिउची बायको म्हणाली, 'पहा, सगळं, कांहीं तयार आहे. आणि लग्नानंतर मुलाची प्रकृति सुधारली नाहीं तर मीं त्याला पुरा बरा होईपर्यंत माझ्याजवळ ठेवीन, मुलीकडे जाऊं देणार नाहीं.

दाई चहा पिऊन निरोप घेऊन परत सुनकडे आली आणि त्याला व त्याच्या बायकोला तिनें सर्व सांगितलें. नवराबायकोपुढें प्रश्न पडला, नवरा मुलगा मरणार असला तर त्याच्या घरांत जाऊं देऊन मुलीच्या जन्माचा सत्यानाश व्हावा याला त्याची मुळींच तयारी नव्हती, पण तो फारसा आजारी नसला तर लग्न मोडल्यास मात्र सारी तयारी बुडीतखातीं आणि लोकांत चर्चा- त्यांचा मुलगा युलांग तेथें होता, तो एकदम म्हणाला,

'जांवयाला पाहूं देत नाहींत म्हणजे तो नक्कींच अत्यवस्थ आजारी आहे; आपल्याला ठरलेल्या वायद्यांतून हात मागें घ्यायला कांहीं मार्ग नाहीं, तरी माझ्या बहिणीला अशी खाईत ढकलतांहि येत नाहीं. माझी एक योजना आहे, ती तुम्हाला कशी वाटते तें पहा. मध्यस्थ बाईकडून लिउकडे निरोप पाठवूं कीं लग्न ठरल्या तिथीलाच होईल. पण हुंडा, करणी, मानपान, दागदागिने आणि नवरीचा बाकीचा सारा साज मात्र जांवईबुवांना बरें वाटल्यानंतर पाठवूं. या सूचनेला ते नक्की नकार देतील, आणि मग दोष त्यांच्याकडे जाईल.

'आणि ते कबूल झाले तर ?' आईबापांनी शंका काढली.

'ते कबूल करणारच नाहींत, नाहींतर तिथी पुढें ढकलायला ते तयार झाले असते. आणि मुलीबरोबर ऐवजघरांत येत नसेल तर



पोसायला आणखी एक जीव कशाला पत्करतील ते ?' त्याचा बाप म्हणाला.

'बरें आहे. ते झालेच आपल्या अटीला कबूल तर तुला मुलीचे कपडे घालून बहिणीच्या बदली नवरी म्हणून जावें लागेल. बरोबर पुरु-षाचे कपडे नेतां येतील. जांवई बरा झाला किंवा कांहीं धोका उत्पन्न झाला तर तूं ते कपडे घाल. तें कांहीं म्हणूं शकणार नाहींत कारण त्यांना गांवभर छी थू होण्याची भीती राहील.

'छे, तें शक्य नाहीं !' मुलगा म्हणाला. 'एकतर माझें सोंग ताबडतोब उघडकीस येईल. आणि लोक माझ्याबद्दल काय म्हणतील ?'

'म्हणतील तूं एक खोडी केलीस त्या लोकांकडे, एवढेंच. अजून तूं कोवळा बच्चा आहेस, बराचसा बहिणीसारखा दिसतोस. फार ओळख नाहीं अशांना तूं कांहीं वेगळा दिसणार नाहींस त्यांतून नवरीचा पोशाख झांकून घेईल

सगळें. एवढें काम तुला केलेंच पाहिजे. हें ठरलें नक्की. वेणी घालायला म्हणून तुझ्या पाठराखणी आपली आपली दाई तुझ्याबरोबर येईल. जर लिउचा मुलगा दगावला तर त्याला माझी मुलगीहि मिळणार नाहीं, ना हुंडा ना साजशृंगार.'

लिउच्या बायकोला ही सूचना मध्यस्थ बाईकडून जेव्हां मिळाली, तेव्हां क्षणभर तिला विचार पडला, पण नाहीं म्हटलें तर आपली इभ्रत काय राहील हें लक्षांत आल्यामुळें तिनें तोंजवर हांसू आणून सूचनेचा स्वीकार केला.

लग्नतिथिच्या दिवशीं यू लांगला नवरीचा वेश घेणें भाग पडलें. अडचणी दोन गोष्टीं बद्दल निघाल्या त्याच्या बहिणीसारखीं बारीक नाजुक सुंदर पदकमलें त्याच्या पुरुषी मायांची कशीं होणार? त्याला टांचेपर्यंत पोहोचणारा परकर नेसवण्यांत आला आणि बहिणीसारखा लयदार चालीचा अभ्यास करून त्यानें तिला पोट धरधरून हंसायला लावलें. दुसरी अडचण कर्णफुलांची, त्याचा एकच कान टोंचलेला होता आणि लहानपणीं त्या कानांत बाळी घालीत असत, एवढ्यासाठी कीं भुताखेतांनी मुलगी समजून त्याच्याकडे दुर्लक्ष करावें. आपल्याला खरोखर प्रिय असेल तेंच घेऊन जायचा भुतें प्रयत्न करतात, मुलींसारख्या विशेष महत्त्व नसलेल्या गोष्टींकडे भुतेंखेतें ढुंकूनहि पहात नाहींत हें सर्वश्रुत आहे.

तेव्हां युलांगनें डाव्या कानांत एक डूल घातला व उजव्या कानाच्या भोकाचें ठिकाणी जखम झाल्यासारखी एक बारीक पट्टी बसवली. नवरीचा मोत्याचा मुकुट त्याचें डोकें कपाळ आणि खांदे झांकायला उपयोगी पडला. सोन्याचांदीच्या जरतारींनी मढवलेला वधूचा लाल पोषाक आंगभर होताच. ओठांना व गालांना लाली लावून वेषांतर पूर्ण झालें.

अखेर संध्याकाळ आली. सनयाचौघडे वाजूं लागले. फुलांनीं शृंगारलेला मेणा आला. मध्यस्थ बाई पुरी फसली, नवरी तिला सुंदर दिसली. नवरीचा भाऊ कुठें आहे हें तिनें विचारलें, तेव्हां यू लांगला बरें नाहीं, तो जरा पडून आहे असें कळलें. वास्तविक त्यावेळीं तोच वधूच्या पोषाकांत खोटे हुंदके देत आईबापांचा निरोप घेण्याचें नाटक करीत होता.

अखेर एकदां वधूची मिरवणूक निघाली. तिच्याबरोबर एकुण सामान होतें. एक लहानशी चामड्याची पेटी. लिउच्या घरीं चर्चा चालली होती.

'नवरी आली म्हणजे उंबरठ्यावर तिला भेटून घरांत आणायच्या विधीसाठीं नवरा मुलगा तिथें असायला पाहिजे, नाहींतर तें रीतसर लग्न होणार नाहीं, पितरांना वंदन करायला सून एकटीच उभी राहील, तेव्हां काय करायचें?'

'इलाज नाहीं' नवऱ्या मुलाची आई म्हणाली 'आपली मुलगी भावाच्या जागीं उभी राहील, त्यानें म्हणायचे मंत्र म्हणेल, आणि विधी पुरा होईल'

आणि तदनुसार विवेकिनीनें आपल्या सुंदर पोषाकांत उभें राहून तोतया मुक्तेचें स्वागत केलें, तिला मेण्यांतून उतरवली, व तिच्याबरोबर जरूर ते मंत्र म्हटले. मग दोघांनीं देवघरांत जाऊन देवतांना साष्टांग नमस्कार घातला. दोन पोरींना नवरा-नवरीसारखे सगळे विधी करतांना पाहून कित्येक पाहुणे मनांतल्या मनांत हंसले.

लिउच्या बायकोनें वधूवेषधारी यू लांगला आजारी नवऱ्या मुलाच्या बिछान्यापाशीं नेलें, पण घरांतल्या गडबडीमुळें त्रास होऊन त्याला ग्लानि आली होती, त्याला हुशारी आणण्यासाठीं त्याच्या तोंडात चार चमचे गरम रस घालावा लागला.

अखेर वधूला शृंगारलेल्या मखरात नेण्यांत आलें, तिची ओढणी दूर केली तेव्हां तिच्या रूपाची सर्वांनी तारीफ केली. लिउच्या बायकोला मात्र थोडें मनाला डांचत होतें कीं या नववधूची किती हानी होण्याची भीति आहे, आणि आपला लेक किती दुर्दैवी कीं अशा भाग्याच्या क्षणाला तो आजारी पडून मुकावा.

भोंवतालीं जमलेल्या मंडळीचीं कुरूप तोंडें पाहून कंटाळणाऱ्या यू लांगला विवेकीनीचें रूप पाहून मात्र वाटत होतें 'माझें अगोदरच दुसऱ्या मुलीशीं लग्न ठरलें आहे ही किती कटकट आहे, दैवानें मला जी द्यायला पाहिजे होती ती ही येथें आहे.'

विवेकिनीलाहि त्याच्याबद्दल एक अनिवार्य ओढ वाटत होती. ती आपल्या आईला आणि मध्यस्त बाईला म्हणाली 'माझा दादा कमनशिबी बिचारा, आणि वहिनी आज रात्रीं एकटी, खिन्न राहील. किती मोहक दिसते! माझा नवरा जर तिच्यासारख्या रुपाचा असला तर मग जन्मभर कांहीं खेद उरणार नाहीं'

जेवणावळ संपली. संगीतकारांची बिदागी देऊन बोळवण झाली. पाहुणे निरोप घेऊन गेले. वधूच्या महालांत दाईच्या मदतीनें यू लांग आपला नवरीचा सरंजाम उतरून जरा मोकळा होत होता.

लिउ आणि त्याची बायको आपापसांत म्हणत होते, 'आपल्या घरांतल्या पहिल्याच रात्रीं सूनबाईनें सजवलेल्या शेजघरांत एकटेंच झोंपावें हें कांहीं बरोबर नाहीं. विवेकिनीला तिच्या सोबतीला जाऊन निजायला सांगितलें तर बरें होणार नाहीं कां?' लिउनें नेहमींप्रमाणें आक्षेप काढले, पण ते बायकोनें धुडकावून लावले. विवेकिनीनें जाण्याचाच आग्रह धरला आणि लौकरच मायलेक नववधूच्या शैय्याघरांत जाऊन बिछान्यापाशीं उभ्या राहिल्या. त्याचे पडदे बंद केलेले होते.

'रात्रीं तुझ्या सोबतीला ही तुझी नणंद आली आहे...' काय म्हणावें हें यू लांगला सुचेना. आपलें बिंग फुटेल ही त्याला भीति होती. पडदे डोक्याभोंवतीं घट्ट धरून त्यानें डोकें मधून बाहेर काढलें,

'मला एकटें निजण्याची संवय आहे,' तो अडखळत म्हणाला, पण वरमाय हांसली.

'आयाय! दोघी एका वयाच्या तर आहांत! बहिणी बहिणींसारख्या. भय कसलें वाटतें? फारच कटाक्ष असला तर दोघींच्यामध्यें एक पांघरुणाची घडी ठेवा म्हणजे झालें.

एवढ्या वेळांत भीतीप्रमाणें हर्षानेंहि यू लांग विचलित झाला होता. त्याच्या शय्येवर स्वतः विवेकिनीच्या आईनें मुलीला आणून द्यावी हा भाग्याचा चमत्कार नव्हता कां? पण तिनें आरडाओरडा केला तर? दुसऱ्या बाजूनें पाहिलें तर—

'ती पंधरा वर्षांची आहे, याचा अर्थ ती बरीच अगोदर योग्य झाली आहे. तिच्या भावनांचें द्वार किंचित उघडलें आहे. मी सावध-






गिरी ठेवली आणि हलके हलके तिच्या हृदयाच्या ज्योती पेटवल्या तर तीं नाहीं म्हणेलशी भीति दिसत नाहीं.'

लिउची बायको आपल्या खोलीत झोपायला गेली. विवेकिनीनें शेजघराच्या दाराला आतून कडी लावली. ती पुनःपुन्हा हांसत होती, आणि त्यामुळें तिचा चेहरा फुलासारखा टवटवीत दिसत होता.

वहिनी तूं कांहीं खाल्लें नाहींस सारा दिवस, तुला भूक नाहीं कां लागली ? काय आवडतं तें सांग; मी जाऊन घेऊन येते तुझ्यासाठीं.'

'वन्सं अशा ममतेचे हे तुमचे उपकार वाटतात'

तेवढ्यांत दिव्याची वात लांब होउन उंच सरळ लाल अशी तेवूं लागली. 'हा दिव्याचा आशीर्वाद' विवेकिनी म्हणाली, 'सुखी हो, म्हणतो आहे तो'

विवेकिनी लाजली, पण तीहि हंसली. यू लांगला एकदम हंसू आलें.

'तुम्हाला हंसायला आवडतं ना वहिनी ?' म्हणून तिचें हळूहळू संभाषण सुरु झालें. अखेर डोक्यातलीं फुलें काढून ठेवून कपडे काढण्यासाठीं ती बिछान्यावर आली.

'कुठल्या उशीवर झोंपणार ?'

'वहिनी देईल त्या'

'एकाच उशीवर दोघें ?'

'हो'

पांघरूणाखालीं शिरून विवेकिनीने वरचे कपडे उतरले, तसेंच बिछान्याच्या आपल्या बाजूस युलांगनेंहि उतरले. बाहेरच्या मेजावरील दिव्याचा उजेड बिछान्याच्या पडद्यांतून अंधुकपणें येत होता. युलांगच्या भावनांनी उचल घेतली.

'किती वसंत बहार पाहिले आहेस तूं ?'

'पंधरा पुरीं होतात या वर्षी.'

'साखरपुडा झाला ?'

विवेकिनी लाजून चूर झाली. त्यानें तिच्या कानाशीं ओठ नेऊन हलकें विचारलें.

'इतकें लाजायचें कशाला ? इथें आपण दोघी मुलीच आहोंत.'

'माझा साखरपुडा पेइच्या मुलाशीं झाला आहे आणि ते लग्न लौकर लावून टाका म्हणून घाई करताहेत, पण सुदैवानें अजून तिथी ठरली नाहीं.'

'मग फारशी आतुरता नाहीं वाटत तर ?'

त्यानें डोकें हलकेच दूर ढकलल्यासारखें करून ती म्हणाली,

'मला असं शब्दांत पकडून माझी गंमत करणं शोभत नाहीं तुला वहिनी. मीं आतुर नसले तर तूंहि कांहीं माझ्या मानानं जास्त आतुर दिसत नाहींस ?'

'अन् कांहीं बाई, तुम्हांला ते कसें कळणार ? निदान आपण दोघी बायका असतांना मीं कशी आतुर होईन ?

'आई बोलते तसेंच बोलतां!' विवेकिनी हांसून म्हणाली, त्यापेक्षां माझं वय पाहिलं तर मीं नवरा व्हायला पाहिजे तुझा, तो एकदम बोलून गेला. विवेकिनीला हंसण्याची उकळी फुटली.

'मींच नवरा म्हणायला पाहिजे, कारण आज लग्नांत माझ्या भावाची जागा मीं घेतली होती.'

'जाऊं दे, वाद नको, त्यापेक्षां आपण नवराबायको असल्यासारखेच वागूं या.'

अशा भाषेनें सुरुवात झाली. हळूहळू एकमेकांच्या देहांची एकेक ओळख दोघांना पटूं लागली. नुकत्याच उदयास आलेल्या तिच्या वक्षांची त्यानें पूजा केली, तिनें त्याच्या वक्षस्थळाबद्दल मनांत आश्चर्य केलें. 'माझ्याएवढी उंच पण अशी कां ही असेल ? पण कांहीं वेळानें धुंद आवाजांत विवेकिनी म्हणाली 'हा खेळ राहिला नाहीं, आपण खरोखरच नवरानवरी झालों–'

'नाहीं, खरोखरीचे नवरानवरी होण्यासाठीं––'

म्हणून त्यानें मनधरणीपूर्वक तिचीं बाकीचीं वस्त्रें दूर केलीं— पण उलट तिनें त्याचा सदरा काढतांच ती एकदम दगडासारखी निश्चल झाली. कठोर आवाजांत तिनें विचारलें 'तूं कोण पुरुष आहेस ? माझ्या वहिनीच्या बदलीं येण्याची तुझी कशी हिंमत झाली ?

'मीं तुझा नवरा आहे...

ती त्याला दूर ढकलून म्हणाली 'तूं कोण आहेस तें मला खरें सांगितलें नाहींस. तर मीं आरडाओरडा करीन आणि मग पस्तावशील 'बाई रागावू नको, सगळें सांगतो. मी तुझ्या वहिनीचा थोरला भाऊ यू लांग. तुझा भाऊ अत्यवस्थ आहे हें कळल्यावर माझे आईबाप माझ्या बहिणीला पाठवायला तयार नव्हते, पण तुझे आईबाप तिथी पुढें ढकलायला तयार नसल्यामुळें मला मुलीचें सोंग करून बहिणीच्या बदली लग्नाला यावें लागलें. तुझ्या भावाला बरें वाटेपर्यंत हें सोंग ठेवायचें होतें. मला कधीं अपेक्षा नव्हती कीं स्वर्गाची देणगी मिळून मला तुझा नवरा होण्याची संधी मिळेल. पण हें आपलं प्रेम आपणां दोघांशिवाय कोणाला कळतां कामा नये.

पुन्हां त्यानें अनुनय केला. तिला मुलगी म्हणून तो आवडला होता. आतां मुलगा म्हणूनहि आवडला. त्यानें प्रेमाच्या शपथा घेतल्या. लौकरच तिचा प्रतिकार हटला, साखरपुडा, आईबाप बोभाटा, सारें विसरून तोंड झांकून घेऊन ती प्रीतीला अर्पण झाली...

प्रणयोन्मादाचे ढग निवळले, पाऊस ओसरला, हवा प्रसन्न झाली दोघें परस्परांच्या बहुपाशांत झोपीं गेलीं.



यू लांगची पाठराखीण म्हणून जी दाई आली होती, तिनें वधूच्या बिछान्यांत विवेकिनीला तिच्या आईनें आणून झोपवल्याचें पाहिल्यापासून ती काळजींतच होती. शेजारच्या खोलींतून तिला रात्रींतलें सगळे आवाज ऐकूं आले, आणि 'हाहाःकार !' असें ती मनांत म्हणाली. उजाडतांच विवेकीनी खोलीबाहेर येऊन आईकडे गेल्याबरोबर म्हातारी आंत येऊन हलकेच युलांगला म्हणाली 'अरे ठका ! चांगला उद्योग केलास ! चारचौघांत कळलें म्हणजे काय होईल ?

'मीं तिला शोधून काढली नाहीं. तिच्या आईनेंच तिला माझ्यापर्यंत आणली. मला टाळतां येण्यासारखें होतें का ?'

'तूं सर्वतोपरी मन आवरून ठेवायला पाहिजे होतेंस.'

'एकांतांत शेजारीं एक सुंदर रमणी असतांना ? दगड लोखंडाचा माणूस असता तरच आवरून राहता. शिवाय तूं गप्प बसलीस तर कुणाला कळणार आहे ?'

वेषांतर पूर्ण करून तो विवेकिनीच्या आईला नमस्कार करायला गेला. नातेवाईक, स्नेहीमंडळी जमली होती. मोठी मेजवानी झाली. संगीताचे कार्यक्रम झाले, संध्याकाळपर्यंत उत्सव चालला. रात्रीं वधूच्या शयनमंदिरांत पुन्हा यू लांग व विवेकिनी यांनीं रात्र साजरी केली. सकाळीहि दोघें बराच वेळ खोलीत राहिलीं. तेव्हां घाबरून म्हातारी दाई सुनकडे गेली आणि तिचा वृत्तांत ऐकून सुन आणि त्याची बायको हतबुद्ध झाली.

'कांहीं अरिष्ट कोसळण्याच्या आंत त्याला घरीं परत आणला पाहिजे ! लग्नाच्या तिसऱ्या दिवशीं मुलीला माहेरून बोलावणें गेलें. पण सून एकदां माहेरीं पाठवलेली परत येईल कीं नाहीं असें वाटून लिउच्या बायकोनें 'मुलगा बरा होऊन लग्नविधी पुरे झाले म्हणजे पाहूं' म्हणून उत्तर कळवलें.

यानंतर म्हाताऱ्या दाईला कांहीं तरी दुर्घटना होण्याची अपेक्षा करीत त्या शय्या मंदिराबाहेर सावध रहाणें प्राप्त आलें. हा वेळ पावेतो नवरदेव रत्नकुमार याला थोडें बरें वाटून आपल्या नववधूकडे त्याचें सारखें लक्ष जात होतें. एक दिवस दोन्हीकडे नोकरांनी धरून त्याला चालवीत शेजघराच्या दाराशीं आणलें. दाई घाबरून ओरडली.

'जावईमहाराज दारांत आले आहेत !'

आंत युलांग–विवेकिनी मिठी सोडून बंद दारापाशीं आलीं.

'दादा तूं उठून फिरायला लागलास ! थकशील ना' म्हणून दार उघडीत विवेकिनी म्हणाली. रत्नकुमारानें नववधूला अभिवादन केले. सहस्र सुखांचा वर्षाव होवो' ती म्हणाली. 'जोडा किती शोभतो तरी' लिउची बायको म्हणाली.

यू लांग मनांत म्हणाला 'आजारातून उठला आहे पण पोऱ्या चांगला आहे. बहिणीचें कांहीं वाईट होणार नाहीं, पण हा फिरायला लागला म्हणजे नवरीजवळ येऊं पाहणार, तेव्हां लौकर पळावे हें बरें !' रात्रीं त्यानें विवेकिनीला सांगितलें कीं मला घरीं पाठवण्याबद्दल तुझ्या आईला घाईच केली पाहिजे, तरच माझी बहीण माझ्या जागीं




येथें येऊन सगळें सुरळीत होईल. उशीर झाला तर सारेंच बिंग बाहेर येईल.'

तुम्हीं जाणार ? मग माझें काय होणार ? एकटीचें ?

त्याचा विचार केला आहे मीं—दुर्दैवानें आपलीं दोघांचीहि लग्नें दुसरीकडे ठरलीं आहेत'

'मीं जीव ठेवायला नको असेल तर मला मरून तुमच्या मागें यावें लागेल' म्हणून ती स्फुंदून रडूं लागली.

'धीर सोडू नको, मार्ग काढीन मीं'

दोघांनीं एकमेकांना घट्ट धरून ठेवलें...

मुलीचें सुनेशीं इतकें रहस्य कां, हा तर्क विवेकिनीच्या आईच्या मनांत आला होता आणि शेजघरावरून जातांना आंत रडण्याचे आवाज व हुंदकारे ऐकूं आले तेव्हां तिनें खिडकीच्या फटींतून पाहिलें—'आश्चर्य आहे' म्हणून दार ढकलायचा प्रयत्न केला, तें बंद होतें.

'हें दार बंद कां असावं ? नवल आहे मोठं.' ती खड्या आवाजांत म्हणाली. प्रेमीजनांनी डोळे पुसून दार उघडलें.

'दोघी मिठ्या मारून कां रडत होतात ?' बाई कडाडली. रागानें थरथरा कापत मुलीचा दंड धरून तिला ओढीत नेत ती म्हणाली, कांहींतरी कारस्थान चाललें आहे, बऱ्या बोलानें सांगितलेंस तर ठीक' खोलींत विवेकिनीला नेऊन आईनें आंतून दार बंद केलें व काठी घेतली हें नोकरांनीं खिडकीच्या फटींतून पाहिलें.

विवेकिनीनें सारें कबूल केलें. व यू लांगशीं लग्न झालें नाहीं तर आपण जिवन्त राहणार नाहीं असा निश्चय आईला सांगितला. आई संतापानें भडकून गेली. 'त्या मढ्या सुनेनें मुलगा पाठवून माझ्या मुलीच्या जन्माचें वाटोळें केलें. त्या पोरट्याला मीं चांगली फोडून काढते' म्हणून ती शेजघराकडे गेली. तिच्यामागें विवेकिनी धांवत गेली, नोकरहि धांवले.

विवेकिनीला आईनें ओढून नेलें तेव्हांच यू लांगला काय तें कळून चुकलें. तेवढ्यांत त्याची दाई येऊन म्हणाली, 'कहर झाला ! विवेकिनीची आई काठी घेऊन तिची तपासणी करते आहे.' दाईनें यू लांगला कपडे बदलण्यास मदत केली, पुढल्या दरवाजानें तो पुरुषाच्या पोषाकांत कसाबसा बाहेर पडला आणि घरीं गेला. बापानें त्याची गय केली नाहीं. मी तुला मुलगीच्या कामाला पाठवला, मुलग्याच्या नव्हे. स्वर्गप्रणित नीतीविरुद्ध कां वर्तन केलेंस ?' अशा कानउघाडणीनें तो खट्टू झाला पण म्हातारी दाई त्याच्या बाजूनें म्हणाली. 'आतां तीं माणसें काय म्हणणार आहेत ? यू लांगनें थोडे दिवस लोकांच्या दृष्टिआड राहावें म्हणजे झालें.

तिकडे लिउच्या घरीं शेजघराबाहेर वर माई गर्जत होती. 'नीचा तूं काय समजलास ठार मारीन तुला ! दार उघडलें नाहीस तर फोडीन' पण दार उघडेंच होतें. मात्र पिंजऱ्यातून पक्षी उडून गेला होता. बाईनें रागून रागून 'मेल्या मरशील आतां' म्हणत बिछान्याखालीं, कोपऱ्यांतून सगळीकडे शोधलें पण व्यर्थ...

विवेकिनी रडत रडत म्हणाली, 'या प्रकारानंतर पेइ घरच्या लोकांना सगळं कळणार आणि मग मला कोण पत्करील ? आई माझें यू लांगशी लग्न लाव नाहींतर मला मरावेंच लागेल.'

तिची आई विचार करीत म्हणाली, 'खरें आहे. या नाचक्कीनंतर तुला कोणी करून घेणार नाहीं. आईची माया पुन्हां लेकीचें सांत्वन करूं लागली, तेवढ्यांत लिउ आला आणि त्याला सर्व परिस्थिति सांगणें भाग आलें. अर्धा दिवस कांहींच न बोलता तो बायकोवर उसळून म्हणाला 'सारा तुझा दोष ! तुला हवें ते माझ्याकडून वदवून घेऊन हा घोळ तूं घातला आहेस, तूं तिथीपुढें ढकलं दिली नाहींस. तूं मुलगीं आपल्या हातांनी त्या मुलाच्या स्वाधीन केलीस व त्याची चांगली सोबत केलीन् नव्हे ?'

बायकोहि तापली, तिचा आवाज चढला, विवेकिनी दोघांचें भांडण सोडवायला गेली, तिघांत आरडाओरडा, हिसकाहिसकी, ढकलाढकली सुरू झाली. काय गडबड आहे तें पहायला मुलगा उठून आला. तेव्हां सगळे गप्प झाले. त्याला गोष्ट कळली तेव्हां तोहि लाल झाला.

'आतां निदान गोष्ट गुप्त ठेवावी नाहींतर गांव आपल्याला हसेल' म्हणून रत्नकुमार गप्प राहिला.

पण तसें कुठें व्हायला, त्यांच्याशीं बरें नसलेल्या शेजाऱ्याला आरडाओरडा ऐकूं गेला होता व यांच्या घरांतल्या एका नोकराला पन्नास तांब्याचें टक्के मिळतांच त्यानें शेजाऱ्याला सर्व हकीकत सांगितली.

शेजाऱ्यानें वेळ न दवडतां पेइच्या घरीं जाऊन सारें निवेदन केलें. पेई लिउकडे आला.

'मला सगळं कळलं आहे. साखरपुड्याच्या साऱ्या देणग्या परत करून टाका, मग एक अक्षरही कोणी बोलायला नको'

लिउ गोरामोरा होऊन विचार करूं लागला, काल घडलेली माझ्या घरची गोष्ट याला आज कशी कळली ? पण त्यानें आव आणून विचारलें,

आतांना असें बोलून आमच्या घराण्याचा अपमान करायचा आहे ?'

'चोरा, खोटं बोलतोस ? खेटरखाऊ ?' म्हणून पेइनें लिउच्या तोंडांत दिली. लिउनें संतापून त्याला ठोसा मारला. मग दोघांची चांगलीच झुंपली. घरांतल्या माणसांनी येऊन दोघांना वेगळे केलें.

'न्यायाधिशापुढें तुझी लबाडी कशी टिकते तें पाहतो' असें क्रुद्धपणें बजावून पेइ गेला.

लिउ म्हणाला, 'सगळा दोष त्या सुनचा आहे, त्याच्याविरुद्ध दाद मागितलीच पाहिजे. नाहींतर तो मात्र सुटून जायचा' आणि मुलाला न जुमानतां तो तक्रार लिहून घेऊन न्यायाधीशाकडे धावत गेला. तिथें लिउच्या अर्जाची सुनावणी चाललीच होती. त्यांच्यात्यांच्यांत पुन्हा बाचाबाची सुरू झाली. न्यायाधीशांनीं कडक शब्दांत समज देऊन दोघांना गप्प बसवलें, व त्यांच्या कैफियती ऐकून घेतल्या. संबंधित माणसांना बोलावण्यांत आलें, त्यांच्या जबान्या घेण्यात आल्या,

शेवटी न्यायाधीशानें निकाल दिला. पहिले सर्व वाङ्निश्चय व साखरपुडे रद्द समजावे. यूलांगनें जिच्याशीं अत्याचार केला तिच्याशीं त्याचें लग्न व्हावें, पण सुन कुटुंबानें लिउ कुटुंबाला भरपाई देणें जरूर, तसेंच लिउ कुटुंबानेंहि पेइ कुटुंबासहि वधू देणें. म्हणून मुक्त सुनचें लग्न पेइच्या मुलाशीं व्हावें आणि युलांगच्या माजी नियोजित वधूशीं रत्नकुमाराचें लग्न व्हावें.

याप्रमाणें निवाडा दिल्यावर राज्यपालानें तीन लाल मेणे मागवले व बरोबर माणसें देऊन तीन नवऱ्या तीन नवऱ्यांच्या घरीं पोहोंचविण्यात आल्या. हंगचौ शहरांत या घटनेबद्दल पुष्कळ दिवस चर्चा झाली. अखेर कांहीं खळबळीची हकीकत मिळतांच लोक ही गोष्ट विसरून गेले. ● ● ●





अनुक्रमणिका

*धूम्रपान ही एक घाणेरडी संवय आहे असं मला कधींहि वाटत नाहीं; उलट इतर कांहीं गचाळ व घाणेरड्या संवयींपेक्षां ही संवय खचींत वाईट नाहीं........*



*मूळ लेखक:*–जे. बी. प्रिस्टले
*अनुवाद:*–ल. नां. गोखले

नुकतेंच माझ्या असें लक्षांत आलें आहे कीं, गेलें अर्धशतक मी पाईप ओढीत आलों आहे. पाईप ओढणाऱ्यांमध्येंच मी वाढलों. माझे वडील आणि त्यांचे बहुतेक सर्व मित्र पाईप ओढणारे होते. पन्नास वर्षांपूर्वी आमच्या देशाच्या उत्तर भागांत कांहीं सच्चे तंबाखूवाले होते. त्यांना व्हर्जिनियामध्यें लॅटाकिया व पेरीक किती मिसळावयाची हें फार चांगलें समजे. कपाटांतून सिगरेटचीं पाकीटें काढून काऊंटरवर तीं गिऱ्हाइकापुढें टाकण्यासाठीं नोकरीस मुली ठेवण्यापुरतें त्या मंडळींचें तंबाखू–प्रेम नव्हतें. मंडळी भरलेला पाईप मोठ्या हौसेनें एकमेकांच्यापुढें करीत असा तो काळ होता. उत्तरेकडे अद्यापहि ही रीत आहे. पण गेल्या कित्येक वर्षांत मी कोणाला असा पाईप दिला नाहीं कीं कोणी मला तो दिला नाहीं. कदाचित् यांत माझें कांहीं चुकत असेल.

अगदीं आजतागायत असें आढळेल कीं युरोपियन नकाशांत तुम्हीं जसजसें वर जाल तसतशी पाईपची तंबाखू सुधारत जाते. इंग्लंडच्या दक्षिणेस ती जशी मिळते त्यापेक्षां उत्तरेकडची अधिक चांगली असते. स्कॉटलंडमध्यें चांगलीच तंबाखू मिळते, त्याचा स्कॉटिच लोकांना अभिमान फार. पण ही आश्चर्याची गोष्ट आहे की, जगांतल्या पाईप ओढणाऱ्यांचें ऋण हे स्कॉटिश लोक कधींच मानीत नाहींत. आयर्लंडमध्येंहि एकप्रकारची चांगली तंबाखू मिळते. युरोपखण्डांत, विशेषतः निम्या उत्तरभागांत गेल्या युद्धापासून परिस्थितींत थोडी सुधारणा झाली आहे. परंतु तिकडील तंबाखू अलिकडे ब्रिटनमधल्या तंबाखूसारखी होऊं लागल्यामुळें एका दृष्टीनें ती खराबच मानली पाहिजे.

अमेरिकेंतल्या पाईपची तंबाखू अतिशय गोड असते. जणुं कांहीं ती ओढण्यासाठीं नसून खाण्यासाठींच असते! सुप्रसिद्ध पुस्तक-प्रकाशक जॉर्ज डोरान हे लॉस एंजलसचें, चॉकलेटचा सुवास असलेलें एक मिक्श्चर ओढतात. पाईप ओढणारा एखादा माणूस जर अमेरिकेंत कांहीं दिवस राहणार असेल तर त्यानें सेंट लुई येथून येणारी 'हेवर्ड मिक्श्चर' नांवाची तंबाखू लक्षांत ठेवावी. अमेरिकेंत असतांना त्या तंबाखूचे पिवळे पौंडी डबे बरोबर घेऊन मी हिंडत असे. तेथें असतांना मन कधीं ठिकाणावर नाहीं असें वाटलें म्हणजे मी या तंबाखूचे पाईप ओढायची. आणि मग आमची गाडी रुळावर यावयाची.

पन्नास वर्षांपूर्वी मी जेंव्हा पाईप ओढावयास लागलो तेंव्हां मी कट-कॅन्हेन्डिश व ग्ल्यूवस्टेन हे पाईप आणीत असे. ते अत्यंत मजबूत असत; आणि तरुण माणसें ज्या दांडगाईनें पाईप ओढतात, तसे ओढल्यानंतरहि ते छान राहात. आणि मग मी पर्युत्सुक बने, सभोंवताल फिरत आहे आणि वितळून जात आहे असें मला वाटे. आमची धूम्रपानाची सुरुवातच अशी खणखणीत झाल्यामुळें पुढें मी अक्षरशः कांहीहि ओढीत आलों आहे. त्याचा अर्थ, प्रत्येक वेळीं मीं तंबाखूची मौज चाखलीच असेल असें नाहीं. पण हें मात्र खरें कीं, अजिबात न ओढण्यापेक्षां मी कसली तरी का होईना तंबाखू ओढीत असे. या वर्षाच्या प्रारंभीं मीं इजिप्तमध्यें असतांना तेथील कोणतीशी स्थनिक तंबाखू ओढण्याचा प्रसंग माझ्यावर आला. कांही झुरक्यांतच मला खोकला येऊं लागला, आणि मग 'संयुक्त अरब राज्या'स शिव्या देण्याखेरीच मला गत्यंतर उरलें नाहीं. हो, तुम्हीं 'संयुक्त अरब राज्य' क्षणभरहि विसरणार नाहीं. सीरियांतील तंबाखू आपल्या देशांत येते हेंच त्या देशास समजत नाहीं. कदाचित् प्रेसिडेंट नासर हे पाईप ओढणारे नसावेत!

जी मंडळी माझ्या धूम्रपानाविरुद्ध आरोप घेणारीं पत्रें पाठवितात त्यांनीं इतःपर आपला वेळ, कागद आणि पोस्टाचीं तिकिटें त्या उद्योगांत वायां घालवूं नयेत. दीर्घकाळ मी तंबाखूचा गुलाम झालों आहे हें मी मान्य करतो. परंतु, सगळींच माणसें कशाची ना कशाची तरी गुलाम असतात आणि तंबाखूपेक्षांहि अति भयंकर असे कांहीं मालक मला ठाऊक आहेत. तंबाखू मला विचार करण्यासाठीं उत्तेजन देते; त्याबरोबरच ती मला आध्यात्मिक अहंकारापासून मुक्त करते. दुसरी गोष्ट म्हणजे गुलामगिरीच्या अत्यंत धोकेबाज प्रकारांपासून ती मला अलिप्त ठेवते. धूम्रपान ही विशिष्ट अशी घाणेरडी संवय आहे असेंहि कधीं मला वाटत नाहीं. इतर कांहीं गचाळ संवयींपेक्षां सतत धूम्रपान करीत राहणें हें खासच अधिक वाईट नाहीं! खुद्द जीवनच हीच एक घाणेरडी संवय म्हणावी लागेल! कारण जीवन जगायचें म्हणजे तुम्हांस अतिशय चोखंदळ बनावें लागतें. आणि खरी शुद्धता फक्त स्मशानभूमींतच प्राप्त होते.

ज्यांना तंबाखू आवडत नाहीं असे लोक धूम्रपानाचा प्रकृतीवर वाईट परिणाम होत








असल्याचें संगतातां. तसें असेलहि. मात्र, हें मान्यच करावें लागेल कीं, आपल्या प्रकृतीविषयीं बेदरकार असणाऱ्या लोकांनीं जगाच्या संस्कृतीच्या विकासास केलेली मदत, प्रकृतीची काळजी करणाऱ्या मंडळींनी केलेल्या कार्यापेक्षां निखालस मोठी आहे. (मागें एकदां 'पंच'मध्यें 'फिट् फॉर व्हॉट ?' या मथळ्याचा एक उत्कृष्ट विनोद आला होता त्याची मला येथें आठवण होते.) तंबाखू व फुप्फुसाचा कॅन्सर यांचा संबंध जोडण्याच्या कल्पनेंतहि कांहीं तथ्य असेल. परंतु, आजच्या एक दशांश किंमत असलेल्या चांगल्या तंबाखूच्या काळांत, मी तरुण होतो तेव्हां, माझ्या आसपास सर्वजण धूम्रपान करणारेच होते. त्यांपैकी कोणालाहि फुप्फुसांचा कॅन्सर झाला नाहीं.

कांही डॉक्टर मंडळी–विशेषतः अमेरिकेंतील—प्रच्छन्न सनातनीपणा व्यक्त करतात असें मला वाटतें. हे लोक मौजेच्या अनेक प्रकारांविरुद्ध आक्षेप घेतात. परंतु सारी आधुनिक जीवन–पद्धतीच मूर्खपणाची आहे असें ते सुचवीत नाहींत. 'वॉलस्ट्रीट'ला आपल्या सर्व स्पर्धकांचा निःपात करण्याच्या प्रयत्नांत १० टेलिफोन ठेवून बसणारा माणूस धूम्रपान करणारा नसेल, दारू पिणारा नसेल, तेलतूप खाणाराहि नसेल आणि म्हणून कदाचित अतिशय निरोगीहि असेल. परंतु, खरी गोष्ट अशी की, वॉलस्ट्रीटच्या बाहेर येऊन आणि तेथील ती मूषक–स्पर्धा विसरून त्यानें काय वाटेल तें जरी केलें, तरी तो पूर्वीपेक्षां अधिक आरोग्यसंपन्न बनेल यांत मला तिळमात्र शंका वाटत नाहीं.

'पण तुम्हीं तंबाखूवर पैसा किती खर्च करतां?' एखादी भगिनी मला विचारते. बाईसाहेब, तसें तें नाहीं आहे. ब्रिटनमध्यें तरी आम्हीं प्राप्तींतील मुख्य भाग तंबाखूसाठीं खर्च करीत नाहीं. आणि समजा, केला तरी त्यांतून आम्हीं कर भरीत असतोच ना. उद्यां आम्हीं सर्व जणांनीं धूम्रपान करणें बंद केलें तर आमच्या सरकारला लक्षावधि पौंडाचें द्रव्य दुसरीकडून कोठून तरी आणावें लागेल. कारण सरकारला तें कधींच न उडवावयाच्या रॉकेटसाठीं आणि दुसऱ्या अणु–अस्त्रासाठी पाहिजेच असतें. सतत कर वाढवून सरकारनें तंबाखूची किंमत पूर्वीपेक्षा बारापट अधिक केली आहे. हा मार्ग शहाणपणाचा मुळीच नाही; यांत दूरदर्शीपणा नाहींच नाहीं, एकप्रकारचा आळस, क्षुद्रता व सूडबुद्धि मात्र आहे. अर्थात् हे असले शब्द उच्चारतांना मी फक्त माझा स्वतःचा विचार करीत आहे. माझी पिढीहि माझ्या डोळ्यासमोर आहे. आज माझ्या बरोबरीच्या कित्येक मंडळीसमोर थोड्याशा पेन्शनमध्यें कसें भागवावयाचें हा मोठा प्रश्न आहे.

समजा, तुम्हीं सत्तर वर्षांचे झालेले आहांत. धूम्रपानाचा आनंद तुम्हीं आयुष्यभर उपभोगिलेला आहे. आतां तर कामधंदा कांहीं नसल्यामुळें, आणि हाताशीं वेळ भरपूर असल्यानें तुम्हांस धूम्रपानाची मौज पूर्वीपेक्षां अधिक चाखतां येत आहे. आतां पाईप हातांत धरून विचार करणें व जुन्या आठवणी आठवणें ही तुमची सर्वोच्च आनंदाची बाब आहे. अशा परिस्थितींत सरकारचे हे अर्थमंत्री, खजिन्याचें संरक्षण करणारे हे पंडित, ऑक्सफर्ड किंवा केंब्रिज विद्यापीठांतून निवडून आणलेले पुरुषोत्तम, तुम्हांला कसे सतावीत असतात पहा! त्यांना अधिक पैसा लागला रे लागला कीं, ते तुम्हाला तंबाखूचा झुरका कांहीं नीट ओढूं देत नाहींत. जीवनामध्यें मिळणारी ही सर्वांत शेवटची आनंद-वस्तु ते तुमच्यापासून हिरावूं पाहतात. परिस्थितीच मग अशी येते कीं, तुमच्या शेगडींत धगधगते निखारेच नसतात. कपाट जवळ जवळ रिकामें असतें. तुमच्या गल्लीच्या टोकाशीं असलेल्या मोठ्या रस्त्यांवरील मोटारींचे आवाज तुम्हांला सहन होत नाहींत. तुमचे सर्व मित्र दिवंगत झालेले असतात किंवा त्या पंथाला लागलेले असतात आणि अशावेळीं सरकारचे अर्थमंत्री तुमच्या खिशांतील नाणीं काढून घेण्यांत गर्क असतात. मग अवस्था अशी उत्पन्न होते कीं, तुम्हांला रिकामा पाईपच तोंडांत धरून बसावें लागतें. तुमच्या हातांत शेजाऱ्याकडून मागून आणलेलें वर्तमानपत्र असतें आणि त्यामध्यें त्यावेळीं तुम्ही वाचीत असता संपत्तीच्या व्यवहारामध्यें कर माफ झाल्यानें लक्षावधि रुपये जमा केल्याच्या हकीगती!

रेस्टॉरंटसमध्यें पाईप ओढणारे कमी आढळतील. तेथें 'सिगार' वाले फार, (सिगार्सचा फायदा अफाटच होतो) विमानांतून पाईप ओढण्यास बंदी केल्यामुळें—आणि ब्रिटिशांनीच ही अवस्था ओढवून घेतलेली आहे—माझ्या सारख्यास विमानप्रवास हें एक मोठें संकटच वाटूं लागतें. जुन्या धर्तीच्या स्टॅटोक्रुझरस्‌मध्यें, खालीं बारमध्यें जाऊन पाईप ओढतां येतो. आणि तो मी अनेकदां ओढलेला आहे. सारे उतारू गाढ झोपलेले असतांना तशा पद्धतीनें पाईप ओढीत व





अनुक्रमणिका

वाचन करीत, मी अटलांटिक महासागर ओलांडला आहे. एकदां तर आमच्या विमानांत खालच्या बाजूस तो छोटा बार नव्हता. आणि तरीहि मी मॉंट्रियलपर्यंत पाईप ओढीत जाऊं शकलो. त्यादिवशीं होता शुक्रवार आणि १३ तारीख. त्यामुळें सारें विमानच माझ्या ताब्यांत दिल्यासारखें होतें. याचा अर्थ असा मानूं नका कीं, मी आपले जुने संकेतच मानीत नाही. वस्तुस्थिति अशी आहे कीं, माझा स्वतःचा जन्मच मुळीं १३ तारखेला झालेला आहे आणि त्यामुळें माझ्यावर १३ तारखेचा घातपाती प्रभाव पडत नाहीं!

पाईपस्चा वास चमत्कारिक असतो हें खरें आहे. पण हेंहि खरें कीं, सिगारच्या शेवटच्या थोटकापेक्षां, पाईपचा वास सहन होऊं शकणारा असतो. धूम्रपान करणाऱ्यांतील मोठा गुन्हेगार, माझ्या मनानें, सिगरेट ओढणारा हा होय. त्याच्या बाबतींत तंबाखू नव्हे, परंतु ती ज्यामध्यें गुंडाळलेली असते तो कागद, सर्व कांहीं घोंटाळा करतो. सिगरेटी ओढणाऱ्या मंडळीनीं भरलेली खोली आग लागलेल्या कागदाच्या गिरणीसारखी दिसते! आणि हेंहि खरें कीं, डोळे, नाक आणि घसा वांच्यावर सिगरेट परिणाम करीत नाहीं, तर ती हातांत धरून झपाट्यानें किंवा ॲश–ट्रेमध्यें राख टाकण्यानें ते परिणाम होत असतात. सिगरेट ओढणाऱ्यांचें वर्तन हें मला नेहमींच एक कोडें वाटत आलें आहे. या मंडळींना जेवणापूर्वीं १० सेकंद किंवा मांस आणि पुडिंग यांच्या दरम्यान सिगरेटचा झुरका कशाला हो पाहिजे असतो? मला असें वाटतें कीं, त्यांच्यांतील पुष्कळ लोक जाणीवपूर्वक धूम्रपानाचा आनंद उपभोगीतच नसावेत. मीं मात्र हा आनंद खरोखरीच उपभोगतो. धूम्रपान न करण्याचें दुःख मी कटाक्षानें टाळतो; मात्र सिगरेट ओढणाऱ्यांना मी 'तंबाखूचे मित्र' मानावयास तयार नाही.

सिगार्स दिसायला चांगल्या असतील, त्यावर कलाकुसर असेल, परंतु पाईपचा आनंद सिगार देऊं शकणार नाहीं. याला, मी एकदां ओढलेल्या ब्राझिलियन सिगारचा मात्र अपवाद आहे. तांबूस ठिपके असलेली ही गडद हिरवी सिगार आश्चर्य वाटावें इतकी नरम असते. तिची दोस्ती अत्यंत सुखद होते. ती सिगार ओढणें म्हणजे एखाद्या जिप्सीच्या गुहेंतून मोठ्या तेजस्वी डोळ्याच्या कारमननें बाहेर येऊन तुमचा हात हातांत धरला आहे, आणि तो तुमच्याशीं शांतपणें शहाणपणाचें कांहीं बोलत आहे, असें वाटतें. पाईपची तंबाखू उपलब्धच नसेल अशा ठिकाणीं भरपेट जेवणानंतर मी सिगार्स ओढलेल्या आहेत; पण मला त्यांचा लगेच कंटाळाहि आलेला आठवतो. सर विन्स्टन चर्चिल यांनीं १९४४ मध्येंच सिगार सोडून देऊन पाईप ओढावयास प्रारंभ केला असता तर कदाचित् आज आपण अधिक सुखी जगांत वावरलों असतों.

पण हें खरें कीं, निश्चितता व शहाणपणा याबाबतींतील पाईप ओढणाऱ्यांची धारणा ही स्वप्नवत्च असते. कांही मंडळींच्या तोंडास पाईप कायमचाच चिकटलेला असला तरी हे लोक समाजांत वावरतानाच पाईप ओढीत असावेत असा मला एक संशय येतो. म्हणजे त्यांच्या बाबतींत पाईप ही एक केवळ फॅशन ठरते. रंगभूमीवरील नटांच्या पाईप ओढण्यासारखाच हा प्रकार मानला पाहिजे!

हें सर्व पाईप–पुराण वाचून पाईपचा प्रथमच आस्वाद घेण्यासाठीं कांहीं वाचक उत्सुक होतील. पाईप ओढण्याच्या माझ्या अर्धशतकानंतर त्यांना कांहीं सल्ला देण्याचें मी धाडस करतों. माझ्या अनुभवांतील गोष्ट सांगावयाची तर पाइप ओढणें कित्येकांना जमलेलेंच नाहीं! त्याचें कारण त्यांची सुरुवातच चुकीची होते हें आहे. ते काय करतात एखादा छोटा हलका पाईप विकत घेतात आणि बहुधा तो कसल्या तरी खराब तंबाखूच्या पिवळ्या पत्तीनें भरतात. त्यामुळें कांही मिनिटांच्या अवधींतच त्यांच्या हातांत भट्टी तयार होते. आणि तोंडांत लाळ गोळा होते. यामध्यें स्वाद कांहींच नसतो, मग आस्वाद घ्यावयाचा कशाला? पाईप हातांत धरायचा तर तो अतिशय तापलेला. तो हातांतून निसटूं पाहतो. आणि मग असे धूम्रपान करणारे हे लोक म्हणूं लागतात, 'पाईप आमच्यासाठीं नाहींतच; प्रयत्न केला पण हें प्रकरण आपल्याला साधणार नाहीं असं आढळलं.' हे लोक कांहीहि म्हणोत, मी मात्र पाईपचा कधींहि त्याग करणार नाहीं!

पाईप ओढणारांनीं सुरुवातीपासून त्याचें तंत्र नीट लक्षांत घेतलें पाहिजे. अगदीं प्रारंभीहि एकच पाईप खरीदूं नका. निदान तीन विकत आणा. तुम्हांला उत्तम बनावटीचे भारी पाईप घेणें परवडलें नाही तर हलके दिखाऊ पाईप आणूं नका. तुम्हाला हवे असणारे चांगले पाईप, एखादा अट्टल धूम्रपान करणाऱ्यानें टाकून दिलेल्या पाइपांत आढळतील. दुसऱ्याच्या कचऱ्यांतून उचलून आणलेले कांही उत्कृष्ट पाईप माझ्याजवळ आहेत; आणि माझ्या पन्नास वर्षांच्या अनुभवानें सांगतों, तुम्हीं जसे पाईप निवडत असता तसेंच पाईपहि तुमची निवड करीत असतो. सुरेख, सरळ, फुंकणीचे, उत्तम वेळूचे किती तरी ऐटदार पाईप मला भेटीदाखल आलेले आहेत. परंतु त्यांतील एकहि मला दहा मिनिटांच्या धूम्रपानाचाहि आनंद देऊं शकत नाहीं. याचा अर्थ असा नाहीं कीं, ते मला जुळणारे नाहींत किंवा मी तरी त्यांच्याजोगा नाहीं. हा वैयक्तिक संबंधाचाच विषय आहे. म्हणून पाईप ओढण्याची चांगली संवय लागेतों छोटे, हलके, पातळ पाईप अगदीं वापरूं नका. ते मुळीं झटकन तापतात. मोठे पाईप दिसायला जड वाटले तरी धूम्रपानाचा आनंद तेच देऊं शकतात. एक गोष्ट मात्र करा तोंडावरची सगळी राख झटकून टाकूं नका. ही राखच पाईपला थंड ठेवीत असते.

पण तीन पाईप कां आणावयाचे? त्याचें असें आहे, गरम पाईप लगोलग भरणें कांहीं खरें नाहीं. त्यामुळेंच तर पाईपचा विशिष्ट वास धुमसत राहतो. एकच पाईप पुन्हां पुन्हां ठासून तासन् तास ओढीत राहणारे लोक पाहिले कीं, मी घाबरूनच जातो. तंबाखूच्या विशिष्ट वासानें अशीं माणसें न्हाऊन निघालेलीं असतात. माझ्या डेस्कवर कित्येक पाईप्स् असले तरी बाहेर पडतांना मी खिशांत फक्त तीनच ठेवतो. पाईप स्वच्छ करण्याची सामुग्रीहि मी काळजीपूर्वक वापरतों. मला भेटीदाखल मिळालेल्या पाईपांत निकोटिन अलग गोळा करणारेहि पाईप आहेत. तशी त्यांच्यामध्यें खास व्यवस्था असली तरी त्या पाईपसची चव मला चमत्कारिक वाटते.

आतां थोडें तंबाखूबद्दल सांगतो. हलकी व्हर्जिनिया किंवा सौम्य मिसळीची तंबाखू







अनुक्रमणिका

मुळींच वापरूं नका. हा माल फार झटपट गरम होतो आणि त्याने जीभ भाजूं लागते. काळी, लॅटिकिया व पेरिक यांचें भरपूर मिश्रण असणारी उंची तंबाखू वापरा. तंबाखू जेवढी कडक, तेवढा तिच्या झुरक्यांत गोडपणा. अशा तंबाखूनें तुमचा पाईप काळजीपूर्वक भरा. या कामी आंगठा वापरूं नका. मधल्या बोटाचा उपयोग करा. मग पाईप पेटवा. तंबाखू जरा धुमसूं द्या. थोडी जळून निवूं द्या, आणि मग सावकाश धूम्रपान करा. अगदीं सावकाश हं. नाही तर खरी गम्मत अनुभवावयासच मिळणार नाही. फार तापलेली तंबाखू चवीला व स्वादाला खराब असते, हें सूत्र लक्षांत ठेवा.

ठांसून भरलेला परंतु थंड असलेला पेटता पाईप, ओढणाऱ्यास जसा खूप करतो तसाच त्याच्या सन्निध येणाऱ्या इतरांसहि खुलवितो. जगभर मी हिंडलों. आणि सर्वत्र लोक मला असें म्हणत आले, 'काय मजेदार तंबाखू तुम्हीं ओढीत असलां पाहिजे!' या तंबाखूच्या गमतीच्या वासाच्या प्रभावानें कित्येक देशांत (पण इंग्लंडमध्यें नाही) मी 'कस्टम्स'मधून सुखानें बाहेर पडलों आहे. खरें म्हणाल तर तंबाखूंत तसें विशेष कांहीच नाही. पण मी तिचा वापर चोख करतों, यांत शंकाच नाही.

आज जर मी तरुण बनेन तर कदाचित धूम्रपानाकडे मी वळणारहि नाही. कारण आजच्या या चढ्या किंमती भिवबून सोडतात. पन्नास वर्षें धूम्रपान केल्यानंतर मला या संवयीचा मुळींच पश्चाताप होत नाहीं. ज्याला निश्चित मरण आहे असा हा मानव प्राणी, भवितव्यापेक्षां कितीतरी अधिक स्वप्नें पाहणारीं आपण माणसें स्वतःवर आशावादाचा व आत्मविश्वासाचा एक प्रयोग नेहमीं करीत असतों. अशा या माणसाला जीवनांत कांहींतरी विरंगुळा हवाच हवा. तंबाखू-पाईप-हा माझा विरंगुळा असूनहि मी कित्येकदां अस्वस्थ व असहिष्णु बनतों. परंतु हा विरंगुळा जर अजिबात नसता तर मला सारेंच असह्य झालें असतें. कदाचित तुम्हीं टोमणा माराल, 'महाशय, तुम्हींच आम्हांला असह्य झालेले आहांत.'

पण माझ्या हातांत जर पाईप असेल तर तुमचें हें म्हणणें मी मुळीं मानणारच नाहीं.

• • •



# पराढे



*गेल्या अंकापासून जगांतील विविध भाषांतील श्रेष्ठ कथाकारांच्या कथांचा अनुवाद आम्हीं आपणांस सादर करीत आहोंत. ' फिलीपाईन ' भाषेतील श्रेष्ठ कथाकार* **एफ्. सिओनिल जोस्** *यांच्या निर्मळ कथेचा* **श्रीकृष्ण ठाकूर** *यांनीं केलेला हा अनुवाद.*

तो आला ती गाडी दुसऱ्या प्लॅटफॉर्मवर उभी होती. गाडी कसली ! डिझेलवर चालणारी भगव्या रंगाची ती ट्रॉली होती. तिच्या काळ्या धुराळ्यांतून बारीक बारीक ' भक् भक् ' आवांज होत धूर बाहेर पडत होता. तो धूर त्याच्या नाकाला कसासाच लागत होता. बांबूपासून तयार केलेल्या बहुतेक टोपल्या रिकाम्याच होत्या. कांहींमधें साबण होता. भाजीपाला होता व त्या लाकडी जमिनीवर ठेवल्या होत्या. त्याच्या आसपासच्या बायका भल्या मोठ्या आवाजांत खाजगी गोष्टी करीत होत्या. उन्हांत काम केल्यामुळें त्यांचे चेहरे काळवंडलेले होते. त्यांच्या रूपाकडे व देहाकडे पाहिल्यावर या इथल्याच कामकरी स्त्रिया आहेत हें त्यानें चटकन् ओळखलें. सहा वर्षांपूर्वी तो एकदां याच गाडीनं आला होता. त्याच्या सोबत अवघी अठरा वर्षांची त्याची मैत्रीण एमी होती. महिना एप्रिलचा होता व ऊन कसं रखरखीत पडलं होतं. जमीन भाजून टाकीत होतं. तेव्हां.ती त्याच्या बाजूला होती.–सहावर्षांपूर्वी.–आणि आतां तो परत त्याच कॅबूगात्रन गावीं चालला होता–एमीला भेटायला चालला होता–पण त्यांच प्रगट मन हेलकावत होतं. त्याला खात्री वाटत नव्हती. कसली ?

शेवटीं ती सारी मंडळी कुयापो शहरीं आलीं. पलिकडे नामपिकुयन गांव, त्या पलीकडे टेकड्या आणि नंतर सपाट मैदान. त्याच्या उजवीकडे बालुंगाओ डोंगराचे उंचवटे दिसत होते आणि डावीकडे रोझेल्स. पांढऱ्या शुभ्र उन्हांत घरांवरील भांग आणि तांदळाची गिरण चकाकत होती आणि गांवातील आकारहीन घरं इतस्ततः पसरलीं होतीं. पानिक्वीइपासून इथपर्यंतच्या





अनुक्रमणिका

प्रवासाला एक तास लागला होता पण त्याला तो वेळ त्यापेक्षांहि कमी वाटला होता. ‘मी माझ्या मुलाला भेटायला चाललों आहे’ तो मनांतल्या मनांत म्हणत होता. ‘माझा मुलगा.’ आणि खरोखरीच तो एमीपाशीं असलेल्या स्वतःच्या मुलाला भेटायला चालला होता. मात्र एमीची गूढ स्तब्धता त्याला आकलन होत नव्हती. ‘माझा मुलगा’ तो परत परत हे शब्द तोंडांत घोळवत होता. त्या शब्दांना–त्या शब्दांमागील भावनेला अवीट गोडी असावी. मुलाच्या कल्पनेनं आपल्या हृदयांत वात्सल्याचा कारंजा थुइथुई नाचूं लागेल असं त्याला वाटलं होतं. पण प्रत्यक्षांत तसं कांहीं घडेना कारण त्याचा तो मुलगा त्यानं अद्याप डोळ्यानीं पाहिला नव्हता.

तो खालीं रुंद अशा सिमेंट प्लॅटफॉर्मवर गेला. स्टेशनमध्यें कांहीं फरक झाला नव्हता. तीच जुनी दगडी बिल्डिंग आणि तेंच गॅल्व्हनाइज्ड् पत्र्याचे भुऱ्या रंगाचें छप्पर.

प्लॅटफॉर्मच्या दुसऱ्या टोकाला तो गेला व व त्यानें भाडोत्री वाहन केलं. वाहनांतून जात असतां त्याला तांदळाच्या गिरणीसमोरील भाताचे प्रचंड ढीग लागले.

हें छोटसं शहर किती दाटीदाटीनें वसविलेलं आहे! म्युनिसिपल बिल्डिंगच्या भोवतीं केळीच्या झाडांची दाटी. बिल्डिंगचं पत्र्याचं छप्पर उन्हांत चकाकत होतं. त्याला जिथं जायचं होतं तें ठिकाण पलिकडेच होतं. तो कॅबुग्वानला चालला होता. तिथल्या वसतीचा पाया त्याच्या आजोबांनीं घातला होता. तिथल्याच एका कोपऱ्यांत त्याच्या वडिलांनीं त्याला लहानाचा मोठा केला होता. तिथल्या परिसराचा त्याला परिचय करून दिला होता.

त्या वस्तींतील कुणाच्याहि घरापेक्षां एमी रहात असलेलं घर मोठं होतं. त्या घराचं छप्पर इतर घरांसारखंच होतं पण त्याची बांधणी लांबरुंद होती व जमिनीवरील बांबूची अंथरणी सुबक होती, नीटनेटकी होती.

एमीचं घर जवळ आलं तसे त्याचे पाय कापूं लागले आणि हृदयांतील धडधड इतकी मोठी झाली कीं ते ठोके त्याला बाहेर स्पष्टपणें ऐकूं येऊं लागले. त्यानं बांबूनीं बनविलेला दरवाजा लोटला व आंत प्रवेश केला. एका ओळीनं लावलेलं ‘सॅन फ्रान्सिस्को’ गवत उंच वाढलं होतं. घरांतील कुणी एक व्यक्ति दरवाजा उघडावयास आली.

‘मनांग, वर या’ बेटिना आनंदानं म्हणाली.

‘इथं यायला किती बरं वाटतं’ हलक्या आवाजांत तो म्हणाला, व तिच्याबरोबर जिना चढून वर गेला, व आजूबाजूला पाहूं लागला.

बेटिनानं त्याला खिडकीजवळच्या सोफ्यावर बसवलं. समोर कांचेचा पृष्ठभाग असलेलं टेबल होतं व टेबलावर मासिकं, वृत्तपत्रं पडलेलीं होतीं.

“एमी कुठाय्?” त्यानें विचारलें.

“एमी कांहीं घरांत नाहीं.” ती मुलगी त्याच्या शेजारीं बसत–म्हणाली. “मी मनीलाला तुम्हांला भेटायला आलें होतें· त्याबद्दल मला फार वाईट वाटतं. त्यावेळीं मी यायला नको होतं.”

“तूं आलीस तें खरंच चांगलं झालं.” तो म्हणाला.

बेटीना दूर बसली व म्हणाली “छेः छेः... इथं आल्यावर तुम्ही भेटल्याचं मी तिला सांगितलं. गोष्टी कांहींतरी निराळ्या घडतील अशी माझी अपेक्षा होती. पण...पण आतां मात्र मला शंका वाटतेय्.”

जिन्याकडून आवाज आला ‘टीना’ मिसेस साल्सेडो आपले कपडे न्यायला आली होती का ग? मी इतकी दमलेय्, माझ्यानं बाई आज कांहीं ते पुरे होत नाहींत.

बेटीनाच्या पाठोपाठ तो दरवाजापर्यंत गेला. तिथं एमी उभी होती. मागच्यापेक्षां थोडीशी वयानं वाढलेली व किंचित् कृश. मातृत्वामुळें येणाऱ्या काळजीच्या छटा तिच्या चेहऱ्यावर अकालीं दिसूं लागल्या होत्या.

‘टोनी, तुझ्यांत कांहींच बदल झाला नाहीं रे’ कुजबुजात्रं इतक्या सावकाशीनं ती म्हणाली. हात दुमडून ती तिथंच उभी होती. त्याक्षणीं त्याला वाटलं, कीं तिच्या जवळ जावं, हळुवारपणें तिच्या अंगावरून हात फिरवावा, चेहऱ्यावरील काळजीच्या रेषांवरून हात फिरवून काळजी नाहींशी करावी, तिची हनुवटी धरून हळुच वर उचलावी आणि तिच्या पातळ, मुलायम ओठांतील अमृत प्राशन करावं. पण तें आतां शक्य नव्हतं. कारण आतां तो, ‘तो’ राहिला नव्हता. एमीच्या लेखीं परका पुरुष झाला होता. तो इथं आला होता तें आपलं इथं कांहींतरी केव्हांतरी हरवलं त्याचा शोध घेण्याकरतां. पण–आतां त्याच्यासमोर उभी होती ती स्त्री. ‘छोकरी’ नव्हे. त्याच्या माहितीची छोकरी नव्हे, तर जिनं जीवनांत एकटेपणामुळें अनंत यातना, अवहेलना, अपमान सहन केले आहेत अशी एक स्त्री उभी होती.

‘टोनी, तूं इथं उगाच आलास. बेटिनानं तुला जें कांहीं सांगितलं त्यावर विश्वास ठेवायला हवा होतास’ नंतर ती आपल्या बहिणीला बेटिनाला म्हणाला, ‘काय ग आज जेवायला काय आहे? अग पाहुण्यांसाठीं कांहींतरी करना!......’

‘मला कांहीं जेवायला रहायचं नाहीं—’ त्याला म्हणायचं होतं. पण ते एमीनं कांहीं ऐकलं नसतं म्हणून तो कांहींच बोलला नाहीं.

‘मी आतां खालीं जातें आणि तुमच्याकरतां काहींतरी पेय घेऊन येतें—आणि तुम्हांला इथं जेवायला रहायचं आहे, होय ना!’ ती म्हणाली.

ती खालीं जात होती व तिनं रुमालानं तोंड दाबलं होतं.

टोनी आरामशीर मागें रेलून बसला व बेटीनाला म्हणाला, “तो कसा आहे!”

‘तो कोण?’

‘मुलगा.’

‘पेपेका? तो चांगला आहे कीं. पण जेवणाच्या वेळेपर्यंत तो यायचा नाहीं. त्याला शाळा आहे ना!’

‘कोणत्या वर्गात आहे तो?’

‘पहिलींत. फार हुषार आहे हा मुलगा. तुम्ही त्याला नेणार नाहींत ना?’

‘नाहीं’ तो धडधडीत खोटं बोलत होता.

स्वयंपाक घरांतून कसलातरी आवाज आला आणि दरवाजांत एक मुलगी येऊन उभी राहिली. ‘मी भात शिजवीत होतें.’ ती म्हणाली.

आणि जेव्हां एमी आली तेव्हां ती मुलगी निघून गेली.






एमी त्याच्यासमोरच्या खुर्चीवर बसली, व सहजगत्या बोलतात त्याप्रमाणें ती बोलूं लागली.

'तुमच्याविषयीं मला कांहींतरी सांगा. हल्लीं तुम्ही काय करतां? बेटिना म्हणत होती कीं तुम्ही हल्लीं युनिव्हर्सीटींत नाहीं म्हणून. तसंच तुम्हांला त्रासहि फार पडतो. खरं का हें? अन् हल्लीं तुम्हीं काय करतां?......किती वर्षांनंतर तुम्हीं आलांत!...तुमचीं पत्रंहि बंद झालींत...नाहीं, तो तुमचा दोष नाहीं'

शांततेची, स्तब्धतेची एक प्रचंड दरी दोघांमध्यें निर्माण झाली होती. कांहीं वेळानं शांततेचा भंग करीत ती म्हणाली, 'मी समाधानी आहे–सुखी आहे. तुमचं सुख मी मानलंय्.......माझ्यासाठीं वाईट वाटून घेऊं नका......जीवन हें धकाधकीचं आहे. त्यांत सुख आहे, दुःखहि आहे. दोघांचाहि आदरानं स्वीकार करायला हवा......'

'माझ्यावरसुद्धां फार संकटं आलीं.' टोनी म्हणाला. 'एका हिंवाळ्यांत तर मी जवळजवळ उपाशी मरत होतों. अमेरिकेंत दिवस काढणं, वाटतं तेवढं सोपं नाहीं. फेलोशिप मिळायची ती पुरेशी नव्हती. पोटाचा प्रश्न सोडविण्यासाठीं मला उन्हाळ्यांत काम करावं लागे. कठीण—फार कठीण काम होतं तें.'

'टोनी, मला जर हें कळतं तर–तर त्यांतून बाहेर पडायला एक मार्ग होता–पण मला माहीत नव्हतं—टोनी, खरंच माहीत नव्हतं..."

कांहीं वेळ थांबून टोनी म्हणाला, "मला तुझी आठवण यायची–वारंवार यायची." हें सांगतांना आपल्या मुलाला जन्म देणाऱ्या, आपल्या आठवणी जतन करून ठेवणाऱ्या या स्त्रीच्या तोंडाकडे पहाण्याचं धैर्य त्याला होईना.

'हें सारं उलट्याचं पालटं, कां आणि कसं झालं कोण जाणे!' तो सांगत होता. 'मी माघारी आलों तेव्हां सरळ तुझ्याकडे यायला हवं होतं.' तो क्षणभर थांबला, घसा साफ केला आणि म्हणाला, 'मला कुणीकुणी कांहीं कांहीं सांगितलं, मनॉंग बेटीनं सुद्धां. त्यांच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं तूं चारचौघांप्रमाणें सभ्यतेच्या मर्यादेनं न वागणारी–स्वैर वृत्तनाची आहेस......तूं मला कधीं पत्र पाठवलं नाहींस तेव्हां खरं काय तें मला कळायला आधार नव्हता. तेव्हां जें ऐकलं तें खरं असं मला वाटलं......'

'टोनी—तूं अशा वाटेल त्या गोष्टींवर विश्वास ठेवावास ना!' अगतीकतेनें ती म्हणाली व तिच्या डोळ्यांत अश्रू जमा झाले.

'असं कसं म्हणतेस?' तो म्हणाला. पण आपली दृष्टी त्यानें बाजूला केली. तिच्या नजरेला नजर भिडविण्याचें धैर्य त्याला होईना. 'एमी, मला क्षमा कर, खरोखरीच मला क्षमा कर.' आतां तिला हुंदका आला होता. 'त्या दिवसांत' रडतां रडतांच ती सांगत होती. 'मी इतकी एकटी होतें, एकाकी होतें—मी माझं दुःख कुणाला सांगूं शकलें नाहीं......सुरवातीला मला वाटे कीं पोटातील हा गोळा दूर करावा, वाटेल त्या तऱ्हेनं, वाटेल तो धोका पत्करून दूर करावा. त्या दिवसांत सायंकाळची पुष्कळ वेळपर्यंत मी घराबाहेर राहीं. वाटे कीं एकादा अपघात घडावा आणि या साऱ्यांतून सुटका व्हावी. पण तुझा विचार मनांत येई, तुला काय वाटेल हा विचार डोकं वर काढी आणि मग अपघाताचा विचार मी माझ्या मनांतून काढून टाकी ...मला वाटे तुला माझी ही अवस्था कळेल नि तूं लौकर परत येशील, याच आशेवर कुणाचीहि पर्वा न करतां मी घरीं गेलें. लोक काय म्हणतील याची मी किंमत केली नाहीं."

"एमी माझ्यावर विश्वास ठेव. मला खरोखरीच फार वाईट वाटतं...तूं बरी व्हावीस, तुझी व्यवस्थित सुटका व्हावी म्हणून मी ईश्वराची प्रार्थना करीत असें. एमी, तुझी मला वारंवार आठवण येई–मी एकटा होतों–बावरलों होतों, तरी तुझी आठवण विसरलों नव्हतों.'

त्या दोघांचे हात एकमेकांत मिसळले. पण तिनें मात्र त्याचा हात घट्ट धरून ठेवला नाहीं. तिचा स्पर्श हा हेतुपुरस्सर नव्हताच. तो काय म्हणतोय् तें मला कळतंय् एवढं दर्शविण्यापुरता तो होता.

'मला खात्री होती कीं तूं कुणी तरी मोठा पुरुष होणार आणि तूं परत येशील तो कुणीतरी महत्त्वाची असामी म्हणून.' ती म्हणाली.

एमी—त्याला माहीत असलेली एमी ही अशी होती. एका जुन्या—फार जुन्या स्वप्नाच्या जगांत ती वावरत होती.

कांहीं वेळ गेल्यानंतर त्यानें विचारलन्, 'काय ग, शेजारीपाजारी काय म्हणतात?'

'तुझ्याविषयीं का? त्या साऱ्यांना माहीत आहे कीं तूं कुणीतरी मोठा झाला आहेस. पण शेजारी–टोनी, शेजारी ते शेवटीं शेजारीच रे. त्यांना आपण इथनं कांहीं दूर करूं शकणार नाहीं. आपणाला हें केव्हां पासून माहीत आहे, नाहीं का!'

त्या दोघांमध्यें केवढी मोठी दरी निर्माण झाली आहे, नव्हे टोनीनें निर्माण केली आहे याची त्या दोघांना परिपूर्ण जाणीव झाली.

'बरं, तूं इथं काय करतेस!' त्यानें तिला विचारलं.

'काय करणार! जगण्यासाठीं धडपड.' असं म्हणत तिनें शिवण्याच्या मशीनकडे बोट दाखविलं तिथं एक सिंगरचं जुनं मशीन होतं व बाजूला छोटसं काचेचं कपाट व त्यांत गिऱ्हाइकांचे शिवलेले कपडे. 'टोनी मी किती भाग्यवान आहे माहीत आहे का तुला? इथल्या बहुतेक प्रमुख लोकांच्या बायका माझ्याकडेच कपडे शिवतात–मेयॅर साहेबांची पत्नी देखील.' पण तो कांहीं हें ऐकायला आला नव्हता. 'एमी मी तुला मदत करूं इच्छितों. कृपा करून नाहीं म्हणूं नकोस.'

'मला मदत? छेः छेः मला रे कशाला मदत?–'

'एमी असं काय करतेस? नाहीं म्हणूं नकोस ना! अग मी काय काय यातना भोगल्या त्याची तुला कल्पना आहे का?'

'अन् मी?—मी काय कमी यातना भोगल्या. माझे वडील–त्यानीं मरणापूर्वी मला किती मारलं—एखाद्या गुराला मारतात तसं. मी तो सारा मार निमूटपणें सहन केला. कांहीं सांगितलं नाहीं—टोनी मी कांहीं सांगितलं नाहीं. माझं गुपित मी माझ्याशींच ठेवलं होतं...'

'तेव्हां तूं मला पत्र लिहून कळवायला हवं होतंस. मी तसाच धांवत आलों असतो–'

'हे देवा! आपण नातेवाईक आहोंत, माहीत आहे ना!'

'म्हणून काय झालं?' टोनी म्हणाला.








'असं कसं म्हणतोस ! शिवाय तिकडे अमेरिकेंत तूं एकटा होतास, अभ्यास करीत होतास. तुझा अभ्यास पुरा व्हायला हवा होता. तें विसरून चालेल का ?......आणि नंतर कांहीं काळानं तूं अन् .कॅरमेन व्हीला यांच्याविषयीं मी ऐकलं......तुम्हां दोघांच्या प्रीतीच्या आड यावं असं मला वाटेना,'

'मुलगा कसा आहे ग !' त्यानें सफाईनें आपल्या पत्नीच्या नांवाचा उल्लेख दूर केला व प्रश्नांची गाडी दुसऱ्या रूळावर नेली.

'त्याचे डोळे अगदीं तुझ्यासारखेच आहेत. सॅमसन त्याचं नांव '

'मीं कांहींतरी केलं पाहिजे नाहीं का ग !'

'तुला करतां येण्यासारख्या कितीतरी गोष्टी आहेत. '

मग मी त्याला माझ्याबरोबर अमेरिकेला घेऊन जातों. तिथं त्याचं सुंदर शिक्षण होईल.'

'अन् तुझी पत्नी काय म्हणेल ?' तिनें लगेच त्याला विचारलं.

'मी कांहीतरी वाट काढीन '

मंद हास्य करीत ती म्हणाली, 'अन् कायरे तुम्हांला मुलें झालीं मग पुढें कसं काय ?'

टोनी क्षणभर गप्प राहिला आणि नंतर सावकाशीनं म्हणाला 'कॅरमेनला–माझ्या पत्नीला बाळंतपण नकोय. गेल्या जुलैंत झालं तें तिचं पाहिलं आणि शेवटचं बाळंतपण.'

'अस्सं ! आणि म्हणून तुला माझा मुलगा हवाय् ! कायरे त्यापेक्षां अनाथाश्रमांतलं एखादं मूल दत्तक कां घेत नाहींस ?'

'मला दत्तक नकोय्. मी माझ्या स्वतःच्या मुलाचा विचार करतोय्. तेवढाच तुझ्यावरचाहि भार कमी होईल......शिवाय मी त्याला चांगलं शिक्षण देईन...जीवनांतल्या कितीतरी गोष्टी मी त्याला देईन. तुला त्यांचीं नांवहि माहीत नसतील...त्याची इच्छा असेल तेवढं तो शिकेल. अमेरिकेंतील सर्वोच्च शिक्षणहि तो घेईल. मग त्याला गरिबी–दारीद्य दिसणारहि नाहीं...एमी नाहीं म्हणूं नकोस. मी कॅरमेनची समजूत घालीन. तिला सांगेन हा मुलगा माझा आहे.'

'टोनी बस्स् झालं. तूं काय म्हणतोस तें मला कळलं.' आवाजांत कडवटपणा आणीत ती म्हणाली, पैसा—टोनी, हा पैसा बोलतोय्. अरे तुला झालंय् तरी काय ? पूर्वी तुझी ही भाषा नव्हती. भूक दारिद्य यांचा तूं पूर्वी कधीं उच्चार केला नव्हतास. काय रे तुझ्यांत हा बदल कशानं झालाय ?'

'एमी विनाकारण माझ्या भावना दुखवूं नकोस......मी इथं आलोंय, मुलाला नेऊं इच्छितोय–त्याला मोठा करूं पहातोय यांत माझा प्रामाणिक हेतु तुला दिसत नाहीं का ? तो इथं राहिला तर माझी त्याच्यावर नजर रहाणार नाहीं व तो कसा वागतो तें मला कसं कळेल ?'

'तो व्यवस्थीत वागेल. तूं त्याची काळजी करूं नकोस.'

'मग तुझ्यासाठीं आणि माझ्या मुलांसाठीं मी काय करावं असं तुला वाटतं ?'

'कांहीं नको' असं म्हणतांना तिचा चेहरा हिऱ्या माणकांप्रमाणं चकाकत होता.

'एमी मनापासन बोल–खरं सांग.'

'टोनी, मी तुझ्याकडे किंवा कुणाकडेच कधींहि खोटं बोललेली नाहीं...... तूं माझं सर्वस्व होतास. मी किती आशेनं तुझ्याकडे पहात होतें ! आपल्या या प्रांतांत तुझ्यासारखा पुरुष युगायुगांतून एखादा जन्माला



अनुक्रमणिका





येतो......टोनी, माझे वडील मरण्यापूर्वी तुझ्याविषयीं हेंच म्हणाले. आम्हां सर्वांना हें माहीत आहे.'

'मी सांगेन तेवढी एक तरी गोष्ट माझ्या करतां करशील का एमी?' अजीजीनें तो म्हणाला.

'हो हो वाटेल ते करीन. पण टोनी, माझा मुलगा तेवढा मागूं नकोस. दुसरं काय हवं तें माग. प्लीज—'

'मुलाच्या सुखाचा प्रश्न आला तरी?'

'त्याचं सुख तूंच एकट्यानं ठरवायचं नाहीं टोनी......तूं इतकीं वर्षं दूर होतास तेव्हां या तुझ्या मुलासाठीं मी गुलामासारखी राबले आहे. टोनी माझा हा मुलगा तुझ्यासारखा मोठा झाला पाहिजे. आणि एके दिवशीं तो हें गांव सोडणार. पण जरी तो इथनं गेला तरी आपल्या मातृभूमिला तो विसरणार नाहीं याची मी काळजी घेईन.'

तो आळसावल्यासारखा असा खिडकीकडे जाऊन उभा राहिला.

त्याच्यामागें उभी असलेली एमी म्हणाली, 'तो बघ शाळेतनं येतोय्.' फार दूरवरून एक मुलगा हातांत पुस्तकं घेऊन त्या घराच्या दिशेनं येत होता.

त्याला पाहून एमीकडे वळून घाईघाईनं तो तिला म्हणाला, 'मी त्याला काय सांगू तें झटकन् सांग बघूं!'

'सत्य तें सांग' ती म्हणाली, 'केव्हांना केव्हां तरी त्याला तें कळणारच आहे. तेव्हां इतर कुणाकडून कळण्यापेक्षां तें तुझ्याकडून कळावं अशी माझी इच्छा आहे. त्यानं मला वारंवार विचारलंय् आणि सांगण्यासारखं होतं तेवढं मी त्याला सांगितलं आहे.'

'काय तें?'

'मला वाटायचं कीं तूं परत येशील. माझं नि तुझ्या मुलाचं स्मरण ठेवशील. म्हणून मी त्याला म्हणायची कीं तुझे वडील एका दूरच्या देशांत गेले आहेत. ते आज ना उद्यां आपणाकडे येतील, आपण सारीं एकत्र राहूं. पण एके दिवशीं—' ती क्षणभर थांबली व म्हणाली, 'आणि एके दिवशीं तूं विवाह केल्याचं मला कळलं......तूं बरं केलंस. पण आतां मुलाला काय सांगायचं? त्याचा बाप परत येण्याची शक्यता आतां नष्ट झाली होती. मी त्याला एके दिवशीं सांगितलं—'

'काय सांगितलंस?'

'कीं त्याच्या वडिलांचा पत्ताच लागत नाहीं. कदाचित् या पुढें त्यांचं आपणाला कांहीं कळणारहि नाहीं. आणि मी माझ्या बछड्याला असं वारंवार सांगून तें खरं मानावयास लावलं आहे. मी त्याला सांगितलं कीं पितृहीन अवस्थेंत तुला आतां लहानाचं मोठं व्हायचंय्, आईचे पांग फेडायचेत्.'

एव्हांना तो मुलगा खालीं आला होता. पायऱ्या चढूं लागला होता. टोनीच्या मनांत वारंवार येई कीं त्या मुलाला सांगावं 'बाळ मी तुझा बाप—तूं माझा मुलगा' पण प्रत्यक्षांत जेव्हां तो मुलगा वर आला व टोनीसमोर उभा राहिला तेव्हां त्याच्या तोंडून शब्द फुटेना. सडपातळ, भुरभुरत्या मऊ केसांचा व आईसारख्या तेजस्वी डोळ्यांचा तो मुलगा. त्याच्या पायांत कांहीं नव्हतं, त्याचा रंग तांबूस तपकिरी होता. त्याची हनुवटी करारी स्वभाव दर्शवीत होती. अशा या मुलाविषयीं कुणालाहि आत्मीयता वाटली असती. टोनीला क्षणभर अभिमान वाटला. पण क्षणभरच. कारण लगेच तो मुलगा आईकडे वळला व आईच्या गालाचा त्यानं मुका घेतला. तेव्हां एमी त्याला म्हणाली, 'बाळ, पेपे' त्यांच्याकडे जा व त्यांच्या हाताचा मुका घे. मुलानं व टोनीनं एकमेकांकडे पाहिलं. पण दोघांच्याहि नजरेंत ओळखीपेक्षां परकीपणाच प्रतीत होत होता.

टोनीनं त्याला जवळ घेतला, छातीशीं धरला, त्याच्या देहाचा वास घेतला. त्याच्या हृदयाची धडधड ऐकली. 'बाळ तुझा हरवलेला बाप आतां आलाय् बरं का' असं टोनीला म्हणावसं वाटत होतं. पण शब्द कांहीं त्याच्या तोंडांतून बाहेर पडेनात. मात्र अत्यंत आपुलकीनं आणि वात्सल्यानं त्यानं 'मुला—मुला' एवढं म्हटलं. टोनीच्या दृढ मिठींतून त्यानं हळूच सुटका करून घेतली व तो आईकडे धावला.

त्या छोट्या खोलींत मुलानं आईला विचारलं 'आई ते माझे वडील का ग?' मुलाचा हा प्रश्न म्हणजे वज्राघात होता. टोनी त्यावर कांहीं बोलला नाहीं. पण शांततेचा भंग करीत एमी म्हणाली, 'नाहीं रे पेपे. ते कांहीं तुझे वडील नव्हत. इथलेच ते एक सद्‌गृहस्थ आहेत, आपले नातेवाईक आहेत, त्यांचं आपणांसर्वांवर प्रेम आहे, आपणांविषयीं आस्था आहे......'

•••

*जीवनांतील एका सनातन सत्याशीं*
*व कूट प्रश्नाशीं संबंधित असलेले*
*हे तीन प्रसंग. या तिन्हीं प्रसंगांत*
*असामान्य अशीं कथाबीजें आहेत.*
*शेंकडों अनुभवांच्या गर्दीतूनहि असे हे अनुभव*
*कायमचे स्मरणांत राहावे आणि प्रतिभावंतांच्या*
*मनाला सतत चाळवित राहावेत यांत नवल तें कोणतें ?......*



— पु. भा. भावे

अगदीं किरकोळ गोष्टींत देखील केव्हां केव्हां फार मोठा आशय आढळतो. अनुभवानें तसा अगदीं साधा. परंतु तो मनावर फार मोठा परिणाम करतो. प्रतिभावंतांना त्या क्षुल्लक घटनेंत देखील सुंदर कथेचीं बीजें आढळतात. अशा **कथा बीजांची** एक लेखमाला 'मनोरे' दीपावलींतून चालू आहे. लेखकांनीं याप्रमाणें आपले कांहीं लेख दीपावलीकडे अवश्य पाठवावेत. योग्य निर्णयानंतर स्थान देण्यांत येईल.

—सं.

माणसांच्या जगाभोंवतीच पशु-पक्ष्यांचे आणि वनस्पतींचें केवढें तरी जग आहे. त्या जगांत प्रत्यक्ष केवढ्यातरी घडामोडी चाललेल्या असतात, जीवनांत जितके रंग आहेत, तितके रंग ह्या घडामोडींत आहेत. मानवी जीवनापेक्षां कांहीं अगदीं वेगळे आणि विलक्षण रंगहि ह्या सृष्टींत आहेत. आपल्या सोबतीनें आणि आपल्याला समांतर अशा रीतीनें ही जीवसृष्टी ह्या धरित्रीवर जगत आहे. तिच्याकडे पहातां पहातां माणूस गुंग होऊन जातो, पुष्कळंदां चकित होतो. पुष्कळदां आनंदित होतो आणि पुष्कळदां खिन्न व अंतर्मुखहि होतो. लेखकानें पाहाण्यासारखे ह्या सृष्टींत कितीतरी आहे.

एके दिवशीं ह्या सृष्टींतल्या अशाच कांहीं तुटक आणि त्रोटक गोष्टी मला दिसल्या आणि त्या माझ्या ध्यानांत राहून गेल्या. विसरूं म्हणतां त्या मला विसरतां येईनात.

घराच्या आवारांत असाच एके दिवशीं मी फिरत होतों. फिरतां फिरतां आवाराच्या दाराशीं गोल उड्या मारत फिरणारा एक कावळा मला दिसला. कावळा ह्या प्राण्याविषयीं मला विशेष कुतूहल आहे. हा प्राणी नेहमीं कुठल्या ना कुठल्या उपद्व्यापांत गुंतलेला असतो. त्याचे ते उपद्व्याप सहसा सरळपणाचे नसतात. किंवा त्याचे उद्योग सरळ पणाचे नाहींत असे आपलें उगाच्च पूर्वग्रहांमुळें आपल्याला वाटतें. भारीचासुद्धां प्रसंगी पाठलाग करणारी कावळ्याची कौतुकास्पद धिटाई, म्हशीसारख्या गलेलठ्ठ प्राण्याच्या पाठीवर निःशंकपणें आरुढ होणारी त्याची विनोदबुद्धी, कुठल्याहि लहानमोठ्या कारणासाठीं ओरडून ओरडून गर्जना करणारी त्याची कांगावखोर वृत्ती, त्याची बळकट आणि निर्भेद चोंच, वांकडी धूर्त मान, मण्यासारखे थंडपणें लुकलुकणारे काळे पण तुकतुकीत शरीर, शोधूनच सांपडणारा नामधारी चेहेरा, ह्या साऱ्यांचीच मला मोठी मौज वाटते. आणि जमेल तेव्हां कुठल्याहि कावळ्याच्या हालचालीकडे मी पहात रहातो. आतां हा एक कावळा उद्यानाच्या फाटकापाशीं मला उड्या मारतांना दिसत होता. तो उगाच उड्या मारीत नव्हता हे तर निश्चित. कुठल्या खटाटोपांत ही स्वारी गर्क आहे, हे पहाण्यासाठीं मी हळूहळूं फाटकापर्यंत चालत गेलों व उभा राहिलों. माझ्या

घेण्याची त्या कावळ्यानें जेमतेमच दखल घेतली. भय बाळगण्याइतकं महत्व तो मला देऊं इच्छित नव्हता. परंतु कावळ्यांच्या परंपरेंत शोभेल अशा रीतीनें त्यानें एकदां माझ्याकडे पाहून घेतलें व माझ्या निरुपद्रवी-पणाविषयीं निश्चिती पटून तो आपलें कार्य करीत राहिला. कावळा एक भयंकर उद्योग करीत होता. भुईवर समोरच अर्धें अंग उभारून एक सरडा बसलेला होता. आणि त्या सरड्याभोंवतीं कावळा घिरट्या घालीत होता. अंगावर शहारे आणील असे त्या सरड्याचे रूप होते. सरडा सावध होता, आणि चिडलेला होता. वारंवार रागानें तो आपलें तोंड घाशीत होता. येवढ्या मोठ्या त्या कावळ्याचे भय असे सरड्याला वाटतांना दिसत नव्हते. त्याचाहि पवित्रा आव्हानाचा आणि संतापाचा होता. समोरून त्या सरड्याला स्पर्श करण्याचा धीर त्या कावळ्यालाहि नव्हता. चटकन् उडी मारून कावळा सरड्याच्या पिछाडीला येत होता, आणि खवलेदार शरीराचा तो लठ्ठ सरडाहि शक्य त्या ओबडधोबड त्वरेनें आपला मोहोरा फिरवीत होता, शरीर उभारीत होता, वारंवार तोंड उघडून फुत्कार सोडीत होता. परंतु सरड्यापेक्षां कावळा फार चपळ होता. त्याला चोंच होती. पंख होते. सरड्याभोंवती कावळ्यानें घिरट्या घालाव्यात व सरड्यानें तोंड फिरवीत रहावें असें कांहीं वेळ चाललें होतें. मग अखेर चटकन् कावळ्यानें सरड्याला शेपटीच्या अंगानें चोंच मारली, क्षणभर त्याला हलविल्यासारखें केलें व टाकून दिलें.

सरडा उलटा पडला व धडपडत पुन्हा सरळ झाला. अद्यापहि सरडा घाबरला नव्हता. त्याच संतापानें अद्याप थोबाड उचलून तो कावळ्याला सामोरा होत होता व कावळा पुन्हा त्याच्यामागें जात होता, निष्ठुरपणें त्याला चोंच मारीत होता. उचलत होता व टाकून देत होता. सरडा धडपडत होता, पोट वर करून पडत होता, इर्षेनें पुन्हां सरळ होत होता. कावळा पुन्हा त्याच्यावर प्रहार करीत होता. त्या दुबळ्या प्राण्यावर समोरून घाव घालण्याचा धीर अद्यापहि त्या कावळयाला होत नव्हता. सरडा घावामागून घाव अंगावर घेत होता. तो दमत होता पण हटत नव्हता, भीत नव्हता. जणूं त्या कावळयाचा घांस घेण्यासाठीं पुन्हां पुन्हां तो तोंड उघडीत होता, कावळा त्याला थांबून थांबून टोंचतच होता. कावळयाला गिळून टाकणें सरड्याला शक्यच नव्हतें. निसर्गानेच तेवढें सामर्थ्य त्याला दिलें नव्हतें. प्रतिकाराची साधनेंहि त्याचेपाशीं फारशीं नव्हतीं. होतीं तीं त्या प्रति-स्पर्ध्याला पराभूत करण्यास पुरेशीं नव्हतीं. केवळ संतापानें व न डगमगणाऱ्या धैर्यानें कावळ्याचा पराभव होण्यासारखा नव्हता. हें द्वंद्व निसर्गतः विषम होतें. एखाद्या किड्या-मुंगीला सरड्याचा पराभव करतां आला नसता व सरड्याला कावळ्याचा पराभव करतां येत नव्हता. एका दुबळ्या दुष्टाची दुसऱ्या बलाढ्य दुष्टाशीं दैववशात् गांठ पडावी, तशी आज किड्या मुंगींचा काळ असणाऱ्या त्या सरड्याची कावळ्याशीं गांठ पडली होती. सरडा निर्धाराने निरुपयोगी ठरणारे झुंजार पवित्रे घेतच होता व कावळा त्याला पुन्हा पुन्हा मारीतच होता.

तो देखावा पहाता पहाता माझ्या अंगावर शहारे येत होते. एका घावासरशीं तो कावळा त्या सरड्याला मारूनहि टाकीत नव्हता. तो त्याला नुसता खेळवीत होता. दमवीत होता. हळूंहळूं घायाळ करीत होता. हळूंहळूं मारीत होता व सरडा अगदी निःशक्त झाला. रागाने जबडा वासण्याची त्याची शक्ति संपली, म्हणजे कावळा त्याला झाडावर नेणार होता. मग सरड्याचा अवतार संपणार होता. सरडा ह्यानंतर एक जिवंत प्राणी रहाणार नव्हता. तर तो त्या कावळ्याचे केवळ भोजन बनणार होता. कदाचित् भुकेल्या काकसंततीच्या तोंडचें अन्न बनणार होता. एक सजीव प्राणी दुसऱ्या सजीव प्राण्याचे कांहीं वेळांतच केवळ अन्न बनणार ह्या कल्पनेनें माझ्या अंगावर सरसरून कांटा आला. तो कांटा कसा-तरी जिरवीत घोगऱ्या गळ्याने मी ओरडलों, 'खुड्' माझ्या उचललेल्या हाताकडे काव-ळ्यानें एकदां पाहिलें व तेवढ्यापुरता तो दोनचार हात पलीकडे गेला. घायाळ सरडा वीतभर अंतर कष्टानें चालून गेला असेल नसेल तोंच कावळा पुन्हा परतून आला व सरड्याभोंवती प्रदक्षिणा घालूं लागला.

सरड्याच्या अंगातून आतां रक्त येत होतें, त्या रक्ताचीच तहान कावळ्याला लाग-लेली होती. कावळ्याप्रमाणेंच सरडाहि मला आवडत नाहीं, पण मला आतां त्या सरड्याची दया वाटूं लागली. हे विषमयुद्ध होतें व त्यांत सरडा पराभूत होत होता. शूरपणें शत्रूला तोंड देतां देतां पराभूत होणार होता व मारला जाणार होता. उगाचच अन्यायानें केवळ त्या कावळ्याची भूक थांबविण्याकरतां मारला जाणार होता. आतां ह्या क्षणींच त्याच्या अंगांतून रक्त येत होतें व आपल्या निर्दय शत्रूला तोंड देत तो पुन्हा मोठ्या कष्टानें वाटोळा फिरत होता. सरड्याचें रक्त पाहून मला हिचक बसली. माझा जीव तुटला व पुन्हा 'खुड्' म्हणून ओरडत मी एक दगड कावळ्याच्या दिशेनें भिरका-वला. कावळा पुन्हा एकदां उड्या मारीत थोडा दूर झाला, पुन्हा जवळ आला व पुन्हा त्याने शेपटीच्या अंगानें त्या सरड्याला उलथें पालथें केलें. सरड्याचें रक्ताळलेलें अंग आतां धुळीनें माखलें व तो अगदी विपन्न दिसूं लागला.

कावळ्याला मी हाकलावें, त्याने जरासें दूर जावें व पुन्हां परतून त्या सरड्याकडे यावें असें कितीतरी वेळ चाललें होतें. आतां सरडा अगदी थकून गेला होता, जवळ जवळ अर्धमेला झाला होता. कुठल्या पापाचे प्रायश्चित म्हणून, नियतीच्या कुठल्या न्यायानें त्या सरड्याची ह्या कावळ्याकडे आज येथें गाठ पडली होती कोणास ठाऊक ! पण या कावळ्याच्या रूपानें हालहाल करून मारणारा यमदूतच त्या सरड्यासमोर उभा होता. तो त्याला खेळवीत होता, आपटीत होता, त्याचें रक्त काढीत होता. प्रथम कांहीं वेळ त्यांची लढत पाहिल्यावर आतां मी त्या सरड्यास वांचविण्याचा प्रयत्न करीत होतों. प्रथम तरी त्यांची ती एकांगी लढाई तटस्थपणे मी कां पाहिली ? सुरवातीलाच त्या सरड्याला वांचविण्याचा प्रयत्न मी कां केला नाहीं ! परस्परांचे जीव घेणाऱ्या जोडीचें रक्त पहाणाऱ्या प्रेक्षकाची विकृती माझेहि ठिकाणीं होती कीं काय? पाली-प्रमाणेंच सरडा हा देखील एक किळस-वाणा जीव वाटत होता, म्हणून तर मी प्रारंभीं तटस्थ राहिलों ! आणि मग त्या सरड्याची दैन्यावस्था पाहिल्यावर माझें मन द्रवलें ! पडलेल्याची कड मला घ्यावीशी वाटली ! आणि अशक्ताला छळून रक्तबंबाळ करणाऱ्या सरड्याविषयीं मला दया वाटूं लागली ! आणि मग मी त्या सर-

ड्याला वांचवण्यास धावलों ! मी पुन्हां एकदां दगड उचलला व फेंकला. कावळा नांवापुरता दूर झाला व जवळ आला. पुन्हां त्यानें सरड्याचें शेंपूट धरलें व त्याला आपटलें. रक्ताने व धुळीनें भरलेला सरडा पुन्हां फार कष्टानें सरळ झाला. मी दगड उचलला व मग विचार करीत थांबलों. माझ्या ध्यानांत आलें कीं सरड्याला सहाय्य करण्याची वेळ निघून गेली होती. त्याच्यांतील प्राण संपले होते. आतां तो मरणारच होता, त्यानें लवकर मरणेंच इष्ट होतें. कावळ्यानें त्याची कदाचित लवकर सुटका केली असती. खिन्न मनानें मी त्या सरड्याकडे पाठ फिरविली तेव्हां तो कावळा उडी मारून सरड्याच्या पिछाडीस येतच होता. तें केविलवाणें व किळसवाणें दृश्य ह्यापुढें पहाण्याची माझ्यांत शक्ति नव्हती. पाशवी संघर्षानें भरलेल्या जगांतील ती एक फुटकळ घटना होती, पण त्या घटनेंत जीवनाचा एक निर्भय, निर्दय, सनातन न्याय प्रतिबिंबित झाला होता. एक जीव दुसऱ्या जिवाचे प्राण घेऊन स्वतःचे पोषण करीत होता. सबळ दुर्बळावर अकारणच आक्रमण करीत होता. स्वतःचें रक्षण व पोषण येवढेंच त्या आक्रमणाचें समर्थन होतें, आणि येवढेंच हें समर्थन जीवसृष्टीनें जणूं अनादिकालापासून आज दिनांकापर्यंत मान्यच केलें होतें. आत्मबलिदानाची आणि पररक्षणाची तत्वे मानवी संस्कृतीनें उदयास आणलीं, परंतु पररक्षणाचें व संघर्षाचें पाशवी तत्व आजहि अपराजितच होतें. मानवेतर सृष्टींत तर त्याची सत्ता सार्वभौमच होती. पण मानवी सृष्टींतहि हें तत्व अद्याप वरचढच होतें. ह्याच तत्वाचा एक आविष्कार मी आत्तांच पाहिला होता. व मनोमन फार खिन्न होऊन गेलों होतों. बलाढ्य शत्रूसमोर तो सरडा दीन होऊन गेला होता पण दुबळ्या किड मुंग्यांचा तो सरडाहि कर्दनकाळ ठरत असेल. त्याच्या विषयांत जें घडलें तेच त्यानें अन्य जीवांच्या विषयांत केलें असेल. तोच अकारण अन्याय, तेंच निर्घृण आक्रमण, तसेंच निर्दय वर्तन, तोच प्राण घेण्याचा खेळ !—तर मग काय हा अघोरी खेळ जगाच्या अंतापर्यंत असाच चालू रहाणार होता ! अफाट अंधारांत एखादी पणती जेमतेम जीव धरून लुकलुकत रहावी, तशी निःस्वार्थीची, करुणेची तत्त्वें तो मातलेला अंधेर अधिकच उठावाने दाखवीत तसाच मिटमिटत रहाणार होता !

एरवीं कुणाला उपेक्षणीय वाटेल असा तो रक्तपाती द्वंद्वाचा देखावा मला अनेकदां आठवतो व मी अस्वस्थ होऊन जातों. त्या दृश्यांत जगाच्या शोककथेचें बीज आहे असें मला वाटतें. माझें मन त्या घटनेभोंवती घोंटाळत राहातें, ती घटना मला निराश करणारी वाटते, उद्वेगजनक वाटते व माझ्या मनांतील उद्विग्नता व संदेह शब्दरूप मागत राहतात ! त्यानंतर आणखी एक घटना मी पहातो. त्या घटनेंतहि पुन्हां कावळ्याचा संबंध आहेच. हा कावळा तोच की दुसरा कोणता हें मला सांगतां येत नाही. कारण बऱ्याच बारकाईने वारंवार पाहिल्याविना एका कावळ्याचा चेहरा आणि दुसऱ्या कावळ्याचा चेहरा ह्यांतील भेद कळत नाहीं, पण गोष्टींत कावळा हा आहेच. ह्यावेळीं प्रकार जरा वेगळा झाला आहे. म्हणजे अन्याय आतां एका काकदंपतीवर झाला आहे. या दंपतीनें मोठ्या श्रमपूर्वक आमच्या आवारांतील एका झाडावर आपलें घरटे बांधलें. घरट्यांतून योग्य वेळीं पिल्ले डोकावूं लागलीं. कसे झालें कुणास ठाऊक पण एक अर्धवट वाढलेले पिल्लूं एके दिवशीं भुईवर आदळलें. त्या पिल्लाला पंखाचा उपयोग नीटसा ठाऊक नव्हता. भुईवर तें पिल्लू कोसळलें, तेव्हां ' टायगर ' नांवाचा श्वानराज जवळच पंजावर थोबाड टेकून पेंगत बसला होता. परंतु आकाशांतून पिकल्या फळाप्रमाणे धरणीवर कोसळलेला तो काकपुत्र पाहतांच ' टायगर ' ची गुंगी खाड्कन उतरली. एका झेपेसरशीं त्यानें झाडाखालीं उडी घेतली व तें काकबालक तोंडांत धरलें. त्यासरशी त्या पिलाचे आईबाप काव-काव करीत धांवले. मीहि " हड हड " करून पाहिलें. परंतु तोपर्यंत दोनचार हिसके मारून ' टायगरने ' त्या पिल्लाचा निकाल लावलेला होता. पिल्लाचे आईबाप टायगर भोंवती काव-काव करीत घिरट्या घालीत होते. शक्य तर चोंच मारून त्याच्या अपराधाचें प्रायश्चित देण्याचाहि त्या काकदंपतीचा विचार होता. परंतु टायगर म्हणजे कांहीं एखादा सरडा किंवा उंदीर नव्हता. कावळे मर्यादा सोडून फाजील लगट करीत आहेत असें पाहतांच टायगरने त्यांच्याच दिशेनें उड्या घ्यावयास प्रारंभ केला. रागाच्या व दुःखाच्या भरांतहि कावळ्यांना आपलें सामर्थ्य ओळखणें भाग पडलें. ते झाडावर बसून सारखे ओरडत राहिले.

त्यांच्या डोळ्यादेखत टायगर त्या कोवळ्या काकपुत्राचा फराळ करीत होता. मध्येच संताप व शोक अनावर होऊन कावळे टायगरच्या दिशेनें झेप घेत. त्याच्याभोंवती घिरट्या घालीत, पण नुसता आक्रोश करण्यापलीकडे त्यांच्याहि हातांत अधिक कांहीं नव्हतें. अन्याय व आक्रमण ह्याविरुद्ध ते ओरडा मात्र करीत होते. तेवढेच करणे त्यानंतर शक्य होतें. परंतु त्या हाल होऊन मेलेल्या सरड्याला एवढेंहि शक्य








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

झालें नव्हतें. तो मुकाट्यानेंच आक्रमणाची शिकार झाला होता. आणि जो अन्याय आज ह्या कावळ्यांवर झाला होता, तसाच अन्याय त्यांनी अन्य जीवांवर केला होता. आणि तरीहि स्वतःवर झालेला अन्याय त्यांना भयंकर झोंबत होता. अन्य प्राण्यांवर आपण केलेले अन्याय त्यांच्या खिजगणतींतच नव्हते. स्वतःवर अन्याय होऊं नये, आपण आक्रमणाचे बळी बनूं नये, असें मात्र त्यांना वाटत होतें. स्वतः आक्रमण व अन्याय करणाऱ्या अनेक माणसांनाहि असेंच वाटत असतें. मानवांचा व मानवेतरांचा हा एक समान स्वभावधर्म होता. क्वचित् कांहीं फार सुसंस्कृत माणसेंच तेवढीं परदुःख ओळखतात, व परपीडा टाळतात. एरवी परपीडेवर जगणारे, परदुःखांत सुख मानणारेच फार! आतां आपल्या असहाय बालकाच्या हत्येमुळें हे कावळे दुःखी झाले होते. चिडले होते. परंतु 'टायगर'नें जें केले तेहि निसर्गाच्या त्याच न्यायानें केलें. परंतु त्याच्या त्या कृत्याचें विस्मरण त्या काकदंपतीला कधींहि झालें नाहीं. 'टायगर' दिसला रे दिसला, कीं अद्यापहि ती कावळ्यांची जोडी झटकन त्याला चोंच मारून जाण्याचा प्रयत्न करते. अद्याप त्याच्या भोंवती भोंवती अचानक घिरट्या घालून पोटतिडकीने 'काव काव' करते. जणूं अद्यापहि एका अन्यायाचा ती काकदंपती त्या कुत्र्यापाशी जाब मागते! त्याच्या वर्तनाचे स्पष्टीकरण मागते. सूडाची ईर्षा धरते. आपल्यावर हा अघोरी अन्याय कां व्हावा हें त्यांना कळत नाहीं. ते त्यांना कधी कळणारहि नाहीं. भल्याभल्यांना हें कोडें अद्याप उलगडलेलें नाहीं. ते कावळे दुःखानें, सूडबुद्धीनें, हतबलतेनें हतबुद्धतेनें, नुसते ओरडतच राहतात. जशी माणसेहि आजवर ओरडत राहिली आहेत.

ह्या दोन घटना मी पाहिल्या व विचार करीत राहिलों. विचारांनीं डोकें अखेर अज्ञानाच्या आंधळ्या भिंतीवर फुटत होते. पुन्हां पुन्हां फुटत होते. मग दैनंदिन आयुष्याच्या गर्दींत त्या विचाराचेंच विस्मरण होई. जसें आपल्या मनचे दुःख त्या कावळ्यांनाहि कांहीं काळ विसरावेंच लागे. पण स्मरण देण्याजोगें पुन्हां कांहींतरी घडे. आयुष्यांत तें घडतेच. पुन्हां मनांत कुठें तरी खोल रुतून बसलेल्या त्या घटनांचा कांटा सलूं लागे. असेंच तें दुःख पुन्हां चार आठ दिवसांपूर्वी जागें झालें. पुन्हां रडूं कण्हूं लागलें, पुन्हां स्पष्टीकरण मागूं लागले. पुन्हां आमच्या उद्यानांतच मी कांहींतरी पाहिलें.

दुरून ती वेल मी पूर्वी पुष्कळदां पाहिली होती. दिसायला ती फार सुंदर दिसे. तिला वेल कां म्हणावयाचें तें मला कळत नाहीं. तिला पाने नाहींत की फुलें नाहींत. अशीच आपली ती दुसऱ्या कुठल्यातरी झाडावर वाढते. रेशमाच्या बारीक पिवळसर तंतूसारखी ती दिसते. ते तंतू शेवयासारखे भराभर वाढत आणि वळसे घेत जातात. उन्हांत लकाकतात. दिसायला मोठे मऊमऊ दिसतात. ती वेल एखाद्या झाडावर पसरली म्हणजे तें झाड रेशमी कलाकुसरीनं मढविल्यासारखें दिसतें. गळ्यांत आणि अंगाखांद्यावर सोन्याच्या सांखळ्या घातल्यासारखें दिसतें, आणि पुढे पुढे तें झाड मुळी दिसेनासेंच होतें. ह्या वेलीच्या सोनेरी तंतूनीच मुळीं ते झाड व्यापून टाकलेलें असतें, दुरून पहाण्यांत वेल मोठी कोमल आणि लुसलुशीत दिसते. तशीच ती खरोखर असते, पुष्कळ दिवस लांबून मी ही तंतूमय वेल पहात होतों, आणि तिचें कौतुक करीत होतो.

पुढें मुळीं आमच्या घरांतल्या वाढत्या 'हिरव्या चाफ्यावरच' ही वेल मला दिसली. तिथून ती तगरीच्या झाडावर गेली. तिथून तिनें रातराणीवर आपला साजशृंगार पसरला. न लाजतां न सवरतां ही वेल आमच्या आवारांत त्या झाडावर आली कुठून ह्याचीहि चवकशी मी केली नाही. मला वाटले, बरें झाले ह्या वेलीमुळें आपल्या उद्यानाची शोभा वाढली. झाडांना वेल मिळाली. त्यांना एक नव्हाळीची मैत्रीण मिळाली, सखी मिळाली. वृक्षवेलीच्या संयोगाचें तें कौतुक मी पहात राहिलों.

मग एके दिवशी आमच्या घरीं एक पाहुणा आला आणि माझ्याबरोबर आवारांत फिरतां फिरतां चमकून उभा होत तो म्हणाला, 'ह्या इथें हे लचांड कशाला!' 'कोणतं लचांड!' मी आश्चर्यानें विचारलें.

'अहो हे कोळ्याचं जाळं!'

हिरव्या चाफ्यावर व तगरीवर रेशमी धाग्याप्रमाणें गुंफून बसलेल्या त्या सोनेरी वेलीकडे बोट दाखवित तो म्हणाला.

'वाः!' मी निषेधानें उद्गारलो. 'त्या सुंदर वेलीला तुम्ही कोळ्याचं जाळ म्हणता आहांत!'

'वेल सुंदर असेल हो!' तोहि निषेधपर सूर लावीत म्हणाला. "कोळ्याचं जाळंसुद्धां तसं सुंदरच नसतं कां? पण तें सुंदर जाळं अखेर प्राण घेतं, तसंच ह्या अमरवेलीचं आहे!" "ह्या वेलीला अमरवेल म्हणतात?" अर्थाकडे दुर्लक्ष करून त्या सुंदर नांवाविषयींच विचारणा केली. "हो, हिला आम्ही अमरवेल म्हणतों, आणखीहि दुसरीं नांवं या गळफासाला असतील, पण नांव कुठलंहि असलं तरी तिचं काम तेंच! जीव घेण्याचें!" "म्हणजे! तुम्ही म्हणतां तरी काय आहांत! ही कोवळी रेशमासारखी वेल जीव तरी कुणाचा घेते?" "दुसऱ्या कुणाचा?" हेटाळणीच्या स्वरांत मला उत्तर मिळालें. ज्या कुठल्या झाडावर ह्या वेलीचा फांस चढतो त्याचा, त्या झाडाचा रस चोखून चोखूनच मुळीं हे बांडगुळ वाढतं! त्या झाडाला मारतं आणि त्याच्या जीवावर स्वतः जगतं! हें पहा.

माझे पाहुणे पुढें झाले व मला दाखवूं लागले. त्यांनी दाखविलें तेव्हां कुठें जें कांहीं घडत होतें तें माझ्या ध्यानांत आलें. ती कोवळी वेल प्रत्येक झाडाला गुरफटून आणि गुदमरून खात होती. जसें कोळ्याचें जाळें एकाद्या फुलपांखराला गुरफटून आणि मारून खाते. त्या वेलीची सुबक तांत झाडाच्या फांदी फांदी भोंवती वेढे घालत होती. झाडाच्या अंगात खोल रुतून बसत होती, तिथूनच मुळीं ती आपले पोषण घेत होती. झाडाच्या रक्तामांसावरच मुळीं ती जगत होती. ज्या झाडावर ती वाढत होती त्या झाडाचा जीवनरसच मुळीं ती शोषून घेत होती. तिचा विळखा हा एखाद्या सुंदर विषकन्येचा विळखा होता. ही उपटसुंभ वेल अधांतरीच वाढणारी होती. भुईशीं ह्या नाजुक नारीचा कुठें संबंधच येत नव्हता. झाडाच्या मुळांनी भुईतून पोषण घ्यावे व ते सारें हिनें लुटून फस्त करावें. झाडानें मरत मरत जगायचे तें केवळ हिला पोसण्यासाठी! धडधाकट्या झाडांना मारत मारतच मुळीं ही वेल जगत होती. तिच्या वाढत्या पसाऱ्याखाली झाडांचीं पानें व फुलें दुमडून





गेली होती. चिंबून गेली होतीं. झाडांच्या जिवावर हिची कांति वाढत होती व झाडें बिचारीं निस्तेज होत होतीं. हिच्या देखण्या चिवट पाशांत एकदां सांपडल्यावर त्या बिचाऱ्या झाडांना सुटकाच नव्हती. मरून जाणे हाच त्यांचा सुटकेचा मार्ग. मरेपर्यंत ह्या लवचिक लतेला आपल्या रक्ताचे घोट देत देत त्यांनी जगायचें. झाडे मरगळलीं आणि मेलीं तरी ही वेल मात्र अमरच होती. एक झाड मेलें तर ही दुसऱ्या झाडावर आपले पाश फेकणार होती. त्यांच्या जिवावर जगणार होती. हिचे रेशमी रूप, हिचा सोनेरी रंग ह्यांना आधार अतिशय अघोरी, अन्न शोषणाचा होता. स्वतः जगणें, स्वतः वाढणे, स्वतः सुंदर दिसणे, हीच हिच्या जीवनाची इतिकर्तव्यता होती. तेथें दुसऱ्या कशाचा विचार नव्हता. सौंदर्याचा बुरखा पांघरूनच ही साऱ्या सौंदर्याचा सत्यानाश करणार होती. अशीच वाढूं दिली तर ही अखेर माझें सारें उद्यान उध्वस्त करून टाकणार होती. मग कदाचित् ती स्वतः मेली असती! पण प्रथम साऱ्यांना मारून आतां मारावयास कोणी नाहीं म्हणून ती मेली असती. परंतु बहुधा तिच्या एकाद्या अंकुराचे दुसऱ्या एकाद्या उद्यानांत स्थलांतर झालें असतें. तेथें ती फोफावत गेली असती, तिच्या रुपानें तिची परपीडक, परशोषक व परवंचक परंपरा फोंफावत गेली असती.

परंतु हे मुळीं मी होऊंच देणार नव्हतों. हे असले कुटिल आणि मारक सौंदर्य मी मुळीं जगूंच देणार नव्हतों. माझ्या पाहुण्यांच्या साक्षीनें भराभर मी त्या वेलीचें वाढतें जाळें ओरबाडून काढूं लागलो. "पहा बरं का!" माझे पाहुणे म्हणाले. त्या वेलीचा कुठें अगदी तसूभर तुकडासुद्धां ठेऊं नका. नाहींतर रजाचा गज व्हावा, तशी ती पुन्हां फोंफावेल" आणि आज दोनअडीच महिन्यानंतर मी पहात होतो, तर खरोखरच तसें झालें होतें. एका कोंपऱ्यातल्या छोटेखानी झाडावर पुन्हां त्या वेलीचा जंजाळ वाढत होता. मी तर माझ्या कल्पनेप्रमाणें ही वेल तसूतसूनें ओरबाडून फेकली होती. पण तरीहि अजून ती नाहींशी झाली नव्हतीच. अजूनहि तिचा वंश जीव धरून होता व वाढत होता. शोषणाची व मारण्याची परंपरा अद्यापहि मेली नव्हती. त्या पशुपक्षांत मेली नव्हती. माणसांत मेली नव्हती. येवढेच नव्हे पण निरुपद्रवी वाटणाऱ्या या वनस्पतींच्या सृष्टींतहि मेली नव्हती. तर मग काय ही परंपरा मारणें खरोखरच इतके कठीण होतें काय! इतकें कठोर होतें काय! केवळ अशक्यप्राय असेंच तें कार्य होतें काय? जीवनाच्या परंपरे इतकीच मरण पहाण्याची परंपराहि अटळ आणि अपरिहार्य होती काय! सारी जीवसृष्टी निपटून निघाली, तरच ती परंपराहि निपटून निघणार होती काय! मी विचार करीत होतों. संदेहाच्या व शंकेच्या आवर्तांत गोते खात होतों. पुन्हां पुन्हां माझे डोकें अज्ञाताच्या भिंतीवर आदळत होते.

वर दिलेल्या तिन्ही प्रसंगांत एक समान धागा आहे. या तिन्ही प्रसंगांत कथेचें बीज आहे. हे बीज मोठ्या सत्वाचे व आवाक्याचे आहे. कारण जीवनांतील एका सनातन सत्याशी व कूट प्रश्नाशीं ते संबंधित आहे. या तिन्ही प्रसंगांतून स्वतंत्रपणें कथा निर्माण करितां येतील किंवा हे तिन्ही प्रसंग एकाच धाग्यांत गुंफणेंहि शक्य आहे. हे प्रसंग फुटकळ व उपेक्षणीय वाटत असले तरी एखाद्या कादंबरीला पुरेल असे त्यांच्यांतील मूलधन आहे. मला हे प्रसंग क्षुल्लक वाटलेले नाहींत. शेंकडो अनुभवांच्या गर्दीतून हे अनुभव माझ्या स्मरणांत राहिले आहेत व सतत ते माझे मन चाळवीत आहेत.

•••

*जगांतील श्रद्धा–मूल्यें नाहींशीं होत आहेत म्हणून आपण आक्रोश करीत आहोंत. पण एकीकडे भावुकतेचें हें अनाकलनीय रूप पाहिलें म्हणजे मन गोंधळून जातें कांहीं समजेनासें होतें........*



# तिरुपति

म्हणजे

# श्रद्धेचा महापूर

— सौ. सुंदरा गुर्जर

आजच्या वैज्ञानिक युगांतसुद्धां आपला भारत कांहीं दृष्टींनीं जगांतील इतर देशांपेक्षां निराळा आहे. भारतीय मनाची घडण ही वेगळीच आहे. भौतिक उन्नतीच्या मागें लागलेल्या या जगांत भारतीय मनाची घडण अजून अध्यात्मवादाकडे झुकणारी, श्रद्धेच्या पायावर उभारलेली अशीच आहे.

भारतीय मन नेहमीं संसारांतील कटु अनुभवांपासून कांही तरी विरंगुळा शोधीत आलें आहे. गांजलेल्या मनाला कोठें तरी आधार हवा असतो. ज्या समस्या आपण सोडवूं शकत नाहीं व ज्या परिस्थितीचा आपल्याला निमूटपणें स्वीकार करावा लागतो त्याचें उत्तरदायित्व ज्यांवर टाकतां येईल असें स्थान मनुष्य निरंतर शोधीत असतो. कांहीं अंशीं ही मनःशांति त्याला देवस्थानांत मिळते. अशी देवस्थानें भारतामध्यें उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत व पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत अनेक पहावयास सांपडतात. काशी, रामेश्वर, जगन्नाथपुरी, सोमनाथ अशीं अनेक तीर्थस्थानें आहेत कीं जेथें आज भारतांतील भक्तगण रोज हजारोंच्या संख्येनें जात असतो.

तिरूपति हें देवस्थान अशाच देवस्थानांपैकीं आहे. दक्षिणेकडील अत्यंत जागृत, अत्यंत वैभवशाली आणि अत्यंत लोकप्रिय असें हें देवस्थान समजलें जातें.

तिरूपति हें देवस्थान किती जुनें आहे याविषयीं नक्की माहिती उपलब्ध नाहीं पण हें ख्रिस्तपूर्वकालीन आहे असें म्हणतात आणि दक्षिणेंतील पल्लव, पांड्य आणि चोल राजे हे सर्व तिरुपतीचे भक्त होते आणि या देवस्थानाला राजाश्रय देण्यांत या राजांमध्यें नेहमीं स्पर्धा लागत असे. वैष्णवपंथाच्या रामानुजादि सर्व आचार्यांनीं याचें महात्म्य वर्णिलें आहे.

हें ठिकाण पूर्व घाटाच्या शेषाचल या पर्वतश्रेणीमध्यें आहे. शेषाद्रि हा या पर्वतश्रेणीचा माथा आहे आणि येथें श्रीविष्णु विराजमान झालेले आहेत. याला पृथ्वीवरील वैकुंठ म्हणतात. या संबंधीं प्रचलित पौराणिक कथा आहे ती अशी—

कृष्णावतार संपवुन श्रीविष्णु, वैकुंठामध्यें लक्ष्मीसह क्रीडा करीत असतां त्यांना भेटण्याच्या इच्छेनें वायु तेथें गेला. दारावर पहारा देत असलेल्या शेषानें त्याला अडविलें. तेव्हां दोघांचें भांडण जुंपलें. दोघांच्या बळाची परीक्षा बघण्याकरितां श्रीविष्णूनें शेषाला सांगितले





अनुक्रमणिका

कीं सुमेरु पर्वताचा पुत्र आनंद याला तूं विळखा घाल आणि वायुमध्यें शक्ति असेल तर तो त्याला हलवील. शेष आणि वायु दोघांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा केली. सारी चराचर सृष्टि कापूं लागली तेव्हां लोकांनीं शेषाची प्रार्थना केली. शेषानें थोडा जोर कमी केल्यावर वायूला आपला विजय झालासें वाटलें व त्यानें आनंदगिरीला स्वर्णमुखी नदीच्या किनारीं हळूंच आणून सोडलें. हाच पुढें शेषाचल म्हणून प्रसिद्ध झाला. या शेषाद्रीवर श्रीविष्णु कसे येऊन राहूं लागले याविषयींहि दुसरी एक कथा प्रचलित आहे.

काश्यपादि मुनींनीं ब्रह्मा-विष्णु-महेश यांच्या देवपणाची परीक्षा पाहण्यासाठीं भृगु ऋषींना पाठविलें. भृगु प्रथम शंकर व ब्रह्मा यांच्याकडे गेले. दोघेहि कसोटीला उतरले नाहींत. नंतर भृगुऋषि वैकुंठी श्रीविष्णुकडे आले. श्रीविष्णु लक्ष्मीसह क्रीडा करीत होते. भृगुऋषींना विष्णूला आपल्याच सुखांत मग्न पाहून राग आला व त्यांनीं क्रोधानें विष्णूच्या वक्षस्थलावर लाथ मारली. श्रीविष्णूंनीं चटकन उठून मुनींचे पाय धरले व क्षमा मागितली. भृगु प्रसन्न झाले, पण लक्ष्मीचें निवासस्थान जें श्रीविष्णूचें वक्षःस्थळ तेथें लाथ मारल्यामुळें लक्ष्मी अपमानित होऊन विष्णूला सोडून निघून गेली व करवीर क्षेत्रीं (कोल्हापूर) जाऊन राहिली. लक्ष्मीच्या वियोगानें व्याकुळ होऊन श्रीविष्णु वैकुंठ सोडून पृथ्वीवर आले व स्वर्णमुखी नदीच्या कांठीं शेषाद्रीवर येऊन तेथें राहूं लागले. शेषाद्रीवर रहात असतां एके दिवशीं मृगया करीत फिरतां फिरतां त्यांच्या दृष्टीस आकाशराजाची कन्या पद्मावती ही पडली. तिच्यावर मोहित होऊन तिच्याशीं विवाह करण्याचा त्यांनीं निश्चय केला. लक्ष्मी श्रीविष्णूला सोडून गेल्यामुळें लग्नाला आवश्यक धन त्यांच्याजवळ नव्हतें. तेव्हां ब्रह्मदेवाच्या मध्यस्थीनें कुबेराकडून त्यांनीं कर्ज काढलें व विवाह समारंभ साजरा झाला. या विवाहसमयीं लक्ष्मीला पण बोलावण्यांत आलें होतें. पद्मावती ही पूर्वजन्मींची वेदवती होती. रामावतारामध्यें श्रीविष्णूनें एकपत्नीव्रताचें पालन केल्यामुळें तिच्याशीं लग्न करणें शक्य नव्हतें म्हणून तिची इच्छा त्यांनीं आतां पूर्ण केली. पद्मावतीसह सुखानें कालक्रमणा करीत असतां श्रीविष्णूंना लक्ष्मीचा विरह असह्य झाला व तिनेंहि व्यंकटाचलावर येऊन रहावें अशी त्यांना इच्छा झाली. पद्मावतीनेंहि लक्ष्मीला घेऊन येण्याचा आग्रह धरला तेव्हां श्रीविष्णु महत्प्रयासानें लक्ष्मीला घेऊन आले. आतांपर्यंत कुबेराकडून काढलेल्या कर्जाचें व्याजसुद्धां देणें शक्य झालें नव्हतें तेव्हां ते लक्ष्मीला म्हणाले कीं तूं कलियुगांतील मानवांना विपुल धन दे आणि मी त्यांच्याकडून पापाचरण करवितों म्हणजे मग ते आपल्या पापाचें परिमार्जन करण्याकरितां मिळविलेल्या धनाचा कांहीं अंश मला अर्पण करतील व त्यांतून मी कलियुगामध्यें कुबेराचें व्याज देत राहीन. याप्रमाणें आपसांत ठरवून शेषाचलावर श्रीविष्णु लक्ष्मीसह राहूं लागले. असें आहे या देवस्थानाचें महात्म्य.

तिरुपति हें ठिकाण मद्रास शहरापासून नव्वद मैलावर, मुंबई-मद्रास लोहमार्गावरील रेणीगुंटा जंक्शनपासून सात मैलांवर आहे. भारताच्या उत्तरेकडून आणि पूर्वेकडून येणाऱ्या प्रवाशांना रेणीगुंट्यावरून येणें सोयीचें पडतें. पूर्वेकडून आणि दक्षिणेकडून येणाऱ्या प्रवाशांना गुडूर काटपाडी या लोहमार्गावरील काटपाडी येथून यावें लागतें. तिरुपति हें गांव रेणीगुंट्यापासून सात मैलांवर आंध्र प्रदेशाच्या चितूर जिल्ह्यांतील चंद्रगिरी या तालुक्यांत आहे. तिरुपति गांव तसें फारसें मोठें नाहीं. साधारणपणें दीड चौरस मैलाच्या परिघामध्यें चाळीस हजार वस्तीचें गांव आहे. पण याचें खरें वैशिष्ट्य म्हणजे येथें येणारे यात्रेकरू, विशेष उत्सवाचे दिवस सोडून दिले तरी प्रत्येक दिवशीं इथें येणाऱ्या यात्रेकरूंची संख्या पांच हजारांहून कधींच कमी नसतें. या स्थानाचें धार्मिक दृष्टीनें महत्त्व ध्यानांत यायला एवढी एक गोष्टसुद्धां पुरे आहे.

तिरुपतीला प्रवासी आला म्हणजे त्याला उतरण्यासाठीं देवस्थानच्या खर्चानें बांधलेल्या व देवस्थानच्या खर्चानें ज्यांची व्यवस्था ठेवली जाते अशा दोन मोठाल्या धर्मशाळा आहेत. इथें देवस्थानचें ऑफिस आहे. तिथें जाऊन चौकशी केली असतां चोल्ट्रीमध्यें (धर्मशाळा) रहावयास जागा मिळते. खोलीला भाडें द्यावें लागत नाहीं. चोवीस तास पाणी असलेलें स्नानगृह व संडास प्रत्येक खोलीला स्वतंत्र आहेत. बऱ्याच खोल्यांतून विजेचे पंखे सुद्धां आहेत. आपणांस स्वयंपाक करावयाचा असेल तर त्यासाठीं भांडीं सुद्धां मिळतात.

तिरुपति गांवापासून तिरुमले हें देवस्थान बस मार्गानें बारा मैलावर व पायीं गेल्यास सात मैल अंतरावर पूर्वघाटाच्या पर्वतश्रेणींमध्यें समुद्रसपाटीपासून दोन हजार नऊशें फूट उंचीवर आहे. तिरुमलैला जाणारा मार्ग अत्यंत रमणीय आहे. इथें वर्षांतून आठ महिने पाऊस पडत असल्यामुळें दृष्टीला सर्वत्र हिरव्यागार गवतानें आणि लहान लहान झुडपांनीं आच्छादलेल्या टेकड्या दिसतात. जसजशी मोटर डोंगरावर चढूं लागते तसतसा आसमंतातला प्रदेश अधिक विस्तृत दिसूं लागतो. चहूंबाजूंनीं टेकड्यांनी वेष्टिलेल्या भूभागांत असंख्य जलाशय दिसतात, आणि वेळ सकाळची असेल तर सूर्याच्या सोनेरी किरणांनीं न्हाऊन निघालेल्या सृष्टीचें एक आगळेंच दर्शन घडतें.

वळणें घेत घेत एक एक करत सहा टेकड्या मागें टाकून मोटार वेगांत सुमारें दीड एक तासांत शेषाद्रीवर येऊन पोचते. थंडी जाणवत असते पण यात्रेकरू तेथें दिसणाऱ्या विविध दृश्यांकडे बघण्यांत थंडी वारा सर्व विसरून जातो. मंदिराच्या भव्य गोपुरावर रामायण व महाभारतांतील प्रसंग मूर्तिरूपानें चित्रित केलेले आहेत. तेहि प्रथमदर्शनींच यात्रेकरूंचें मन आकर्षित करून घेतात. येथेंहि बाजार आहेच व यात्रेकरूंना उतरण्यासाठीं सुसज्ज अशा धर्मशाळाहि आहेत.

मुख्य मंदिर द्रविड शिल्पकलेचा एक उत्कृष्ट नमुना आहे. मुख्य प्रवेशद्वार पूर्वाभिमुख आहे. गोपुरावरील सुवर्णाचें विमान चटकन् डोळ्यांत भरतें. मुख्य मंदिराभोंवती तीन प्राकार आहेत. पहिल्या प्राकारांत कृष्णदेव राय, वेंकटपतिराय, अच्युतराय यांच्या प्रतिकृति आहेत. अकबराचे मंत्री तोडरमल आणि त्यांची पत्नी यांच्यापण प्रतिकृति येथें आहेत. दुसऱ्या प्राकारांत यागशाळा, कल्याण मंडप, सोन्याचांदीचीं गरूड, हत्ती इत्यादि वाहनें वगैरे ठेवण्याच्या जागा आहेत. बकुल मालिका, गरुड, रामानुज इत्यादींची मंदिरेंहि याच प्राकारांत येतात. सर्वांत आंतील म्हणजे तिसऱ्या प्राकाराला वैकुंठ प्रदक्षिणा म्हणतात. हा प्राकार फक्त वैकुंठ एकादशीलाच उघडण्यांत येतो. देवळाच्या गाभाऱ्यांत प्रवेश करण्याचा दरवाजा सोन्यानें मढविलेला आहे, आणि या दरवाजासमोरील मंडपाला रंगमंडप म्हणतात. याच रंगमंडपांत ‘हुंडी’ ठेवलेली आहे. ही ‘हुंडी’ या









देवस्थानाची सर्वांत महत्त्वाची वस्तु आहे. सुमारें दीडएक फूट व्यासाचें व तीन फूट उंचीचे तांब्याचें पीप सहा फूट उंचीच्या कापडाच्या पिशवीत घालून ती पिशवी मधोमध किंचित आवळून त्याला डमरूचा आकार दिला जातो व ती सरळ उभी ठेवली जाते. वरचें तोंड मोकळे असतें. परमेश्वराला अनन्य भक्तीने जें जें कांहीं अर्पण करावयाचें असेल तें तें यात्रेकरू या हुंडीत आणून टाकतात. यांत काय टाकलें ते बाहेरून दिसत नाहीं व ही हुंडी पहाऱ्यांत असतें. तिरुपति देवस्थान हें भारतांतील सर्वांत संपन्न देवस्थान आहे व हें अत्यंत जागृत देवस्थान आहे असें याच्याविषयीं सांगण्यांत येतें. व्यंकटेश किंवा श्रीनिवास किंवा बालाजी हा नवसाला पावतोच आणि असे नवस फेडण्याकरितां हजारो भक्तांची येथें रीघ लागलेली असते. वर सांगितलेल्या आकारमानाची हुंडी दिवसांतून दोनदां किंवा तीनदां व ब्रह्मोत्सवाच्या दिवसांत दर तासाला रिकामी करतात. देवस्थानच्या विश्वस्तांसमोर पोलीस पहाऱ्यांत ती रिकामी केली जाते. आम्ही दर्शनाकरितां तिकिट घेण्यासाठीं रांगेत उभे होतों तेव्हां बारा वाजतां ती उघडलेली पाहण्याचा योग आला. अनेक वर्णनें यासंबंधी आजवर ऐकण्यांत आलीं होती. पण सकाळपासून बारा वाजेपर्यन्त गोळा झालेल्या दानाचा तो ढीग पाहून डोळ्यावर विश्वासच बसेना. दोन मण धान्याच्या राशीहूनहि तो ढीग मोठा होता. अलीकडे धान्याचीसुद्धां एवढी मोठी रास बघण्याची डोळ्यांना संवय नाहीशी झाली आहे. त्या राशीमध्यें रुपयांच्या नोटा, सुटे पैसे किती होते याची तर गणतीच नाहीं. पण सोन्याच्या बांगड्या, सांखळ्या, कर्णभूषणें, चांदीच्या सांखळ्या इत्यादि दागिनेसुद्धां असंख्य होते. ह्या दानाची कुठेंही नोंद होणार नव्हती; कुठेंहि दात्याचें नांव छापून येणार नव्हतें. हें भक्तिभावानें परमेश्वराच्या चरणीं समर्पण होतें. हा श्रद्धेचा महापूर, ही भक्ति पाहून मन उचंबळून आलें.

आम्ही तिरुमलवर पोहोंचलो ती वेळ धर्मदर्शनाची नव्हती. धर्मदर्शन म्हणजे फुकट दर्शन. हें पहांटे चारपासून सकाळीं सात वाजेतों व दुपारीं एकपासून संध्याकाळीं सातपर्यंत होऊं शकतें व अशा वेळीं निरनिराळी अर्जित दर्शनें असतात. तेरा रुपये, सात रुपये असे निरनिराळे दर आहेत. तुम्हाला भोग लावायचा असेल तर त्यासाठी निराळी फी आहे. दहीभाताच्या भोगाला तीस रुपये तर जिलबीच्या भोगाला एकशेंपंचेचाळीस रुपये पडतात.

तुम्हाला व्यंकटेशाला वाहनावर आरूढ झालेलें पहावयाचे असेल तर त्यासाठी निरनिराळी फी आकारली जाते. बासष्ट रुपये दिल्यास सोन्याच्या गरुडावर व्यंकटेशाची उत्सवमूर्ति बसविली जाते. बत्तीस रुपयांत चांदीचा हत्ती-घोडा इत्यादींवर. तुमच्या सोयीप्रमाणें वनमहोत्सव करावयाचा असेल तर दोन हजार रुपये द्यावे लागतात. ब्रह्मोत्सव करावयाचा असेल तर पंधराशें रुपये, कल्याणोत्सव करावयाचा असेल तर पांचशें रुपये इत्यादि. श्री व्यंकटेशाला साक्षी ठेऊन तुम्हाला तुमचा विवाह सोहळा पुन्हां एकदां



# युद्धस्य कथा

## शिपायाची बहादुरी

*[ पुराणेतिहासांतल्या काल्पनिक युद्ध–कथा वाचतांना क्षणभर आपण विस्मयानें थक्क होतों. मग विसाव्या शतकांतील आधुनिक शस्त्रास्त्रांनीं लढलेल्या युद्धांतील प्रत्यक्षानुभव जर आपणाला कुणीं सांगितले तर आपल्या अंगावर रोमांच उभे राहिल्याशिवाय रहाणार नाहींत.*

*प्रस्तुत लहान लहान कथा भारतीय फौजेंतील एका उच्चपदस्थ सेवानिवृत्त अधिकाऱ्यांनीं खास दीपावलीसाठीं लिहून पाठविलेल्या आहेत. लेखकानें त्या स्वत: अनुभवलेल्या आहेत. कांहीं घटनांत स्वतः लेखकहि असल्यामुळें त्या वाचतांना क्षणभर श्वासहि रोधावा यांत नवल नाहीं....]*

दुसऱ्या महायुद्धांतील सन १९४० सालची गोष्ट. मार्शल पेतॉंनें जर्मन हिटलरबरोबर स्वतंत्र तह करून आपल्या इंग्रज मित्रांना तोंडघशीं पाडलें होतें. फ्रान्समध्यें दोन तट पडून जनरल द गॉल ह्याचे नेतृत्वाखालीं इंग्लंडमधून राष्ट्रवादी फ्रेंचांनी जर्मनीबरोबर लढाई चालू ठेवण्याचा निश्चय केला होता. फ्रेंचांच्या वसाहतींमध्यें दुही उत्पन्न होऊन कांहीं भाग द गॉल ह्याच्या पार्टीला मिळाला होता; तर दुसरा व्हिची फ्रान्स ( मार्शल पेतॉंला ) राजनिष्ठ राहिला होता. सीरीया व्हिची फ्रान्सचे बाजूचा राहिल्यामुळें तो देश काबीज करावयाचे इंग्रजांनी ठरविलें. हिंदी व इंग्रजी फौजांनी चढाईस आरंभ केला.

अनुक्रमणिका

एका आघाडीवर एका हिंदुस्थानी पलटणीला हल्ला करण्याचा हुकूम झाला. हल्ला सुरू झाल्यावर थोड्याच वेळांत पलटणीच्या कर्नलला कळून चुकलें कीं एका बगलेवर असलेल्या शत्रूच्या मशीन गन्सचा पाडाव केल्याशिवाय हल्ला आणखी पुढें सरसावणें शक्य नाहीं. कारण जय जरी मिळाला असता, तरी मनुष्यहानी अपरीमित झाली असती.

त्याने ताबडतोब ब्रिगेड कमांडर ( वरिष्ठ अधिकारी ) यांना परिस्थिति कळवून आणखी तोफांच्या सहाय्याची मागणी केली. ब्रिगेड कमांडरनी, पलटणीस होते तेथेंच राहाण्यास सांगून ते आणखी कुमकेची व्यवस्था करावयास लागले.

हिंदुस्थानी पलटण आणखी कुमकेची वाट पहात होती. त्यावेळेस लान्स नाईक बदलू राम, सेक्शनचा ( सुमारे ८ ते १० शिपायांचा गट ) तात्पुरता नेता होता. त्यानें आपल्या इंग्रज कंपनी अधिकाऱ्याला विचारलें कीं, आपण कशाकरितां वाट पहात आहोंत. तो इंग्रज कॅप्टन विशेष अनुभव नसलेला एक तरुण अधिकारी होता. त्याने लान्स नाईक बदलू रामला परिस्थिति समजावून दिली व तो पुढें चेष्टेंत म्हणाला, ' काय रे ! तुझ्या सेक्शनला त्या मशीन-गन्स काबीज करतां येतील का ? पण हें पहा बदलू तुला तोफांची वगैरे कांहीं एक मदत मिळावयाची नाहीं. बदलू उद्गारला "हात्तेच्या येवढेंच ना ? ह्याला हो कशाला तोफा पाहिजेत. पहा तर खरी माझी करामत !"

इतकें बोलून बदलू रामनें कॅप्टन् साहेबांना पुन्हा मन बदलण्यास अवसर न देता आपल्या सेक्शनला बोलावून आपली योजना समजाऊन सांगितली व तो निघालासुद्धां.

बदलू शत्रूच्या मशीन गन्सच्या जवळ पोहोचेपर्यंत त्याच्या १० शिपायांपैकीं ४ मारले गेले होते व ३ प्राणांतिक जखमी झाले. तरी पण उरलेले ३ शिपाई घेऊन बदलू नेटाने व धडाडीने आडोशाचा फायदा घेत पुढें सरकत होता. सबंध ब्रिगेड हा तमाशा पहात नुसतें उभें होतें. शत्रूच्या मशीनगन्स, रायफल्स इत्यादि हत्यारांनी त्यांच्यावर गोळ्यांचा वर्षाव केला ! पण ' जया देव तारी तया कोण मारी ?'

अखेर बदलू व त्याचे तीन बहादरगडी शत्रूपासून २० यार्डावर येऊन पोहोचले. तेथून त्यांनी त्या मशीनगन्सवर ग्रेनेडस्चा वर्षाव केला. शत्रूच्या खंदकात सामसूम दिसूं लागताच बदलूने हुकूम दिला. ' संगिनी चढवा, आतां हल्ला करा. ' आणि ह्या ४ बहाद्दरांनी मशीन-गन्सचा पूर्णपणे नाश करून टाकला.

बदलूचा आणि त्याचे शिपायांचा फार मोठा मानसन्मान झाला हे सांगणे नकोच. पण थट्टेमध्येंसुद्धां आपल्या हाताखालच्या शिपायांचे जीव निष्कारण बळी दिल्याबद्दल कॅप्टन साहेबांना मात्र चांगलेच जोडे बसले.

[ या सर्व सत्यकथा असल्यानें अर्थातच मूळची नांवे बदलून काल्पनिक नांवे दिलेलीं आहेत. स्थळांचा निर्देश मात्र सत्य आहे. ]

•••

( विवाहित असल्यास ) करायचा असेल तर तीहि सोय आहे. यात्रेकरू दुसऱ्या आणि तिसऱ्या प्राकारांत हिंडत असतां त्याला ही सर्व माहिती होते आणि वाहनेंहि बघावयास मिळतात.

दर्शनाकरितां ओळींत उभें राहिल्यावर ( पैसे भरल्यावर सुद्धां ) तुम्ही हळूहळू पुढें सरकतां. मधोमध दोरी बांधून एका बाजूनें भक्तांना आंत घेतात व दुसऱ्या बाजूनें बाहेर सोडतात. तुम्हीं आरतीसाठीं अगर अर्चनेसाठीं पैसे भरले असतील तर आरती करण्यांत येते व ती पूर्ण होईतों तुम्हाला तेथें उभें राहतां येते. तुम्हांला तीर्थ व आशीर्वाद मिळतो. श्री व्यंकटेशाची मूर्ति काळया पाषाणाची आहे पण रत्नजडित आहे. किरिट हिऱ्याचा आहे व नानाप्रकारच्या अलंकारांनीं मूर्ति आभूषित असते. या वर्षींच्या ब्रह्मोत्सवांत श्री व्यंकटेशाच्या हातांतील शंख व चक्र हिऱ्याचे बनविण्यांत आलें. त्याला बारा लाख रुपये खर्च आला. व्यंकटेशाचे डोळे मात्र नेहमीं झांकलेले असतात. एकोणीसशे साठ सालचें या देवस्थानचें उत्पन्न एकशेचार लाखाच्यावर होतें. दर वर्षी हें उत्पन्न वाढतच आहे. या उत्पन्नांतून अनेक लोकोपयोगी संस्था चालविल्या जातात. कित्येक महाविद्यालयें, अनाथालयें, रुग्णालयें इत्यादींचा संपूर्ण खर्च देवस्थानाकडून केला जातो. तिरुपतीच्या व्यंकटेश्वर विद्यापीठाला सुद्धां या देवस्थानाकडून अनुदान मिळतें. देवस्थानाच्या हुंडीमध्यें लाखाच्या नोटांचें पुडकें कोणीतरी टाकल्याचें वृत्त अगदीं गेल्या आठवड्यांतलेंच आहे. लाखों रुपयांचें दान आणि तें सुद्धां गुप्त रीतीनें. या युगांत हाही चमत्कार पहावयास मिळतो.

तिरूमलै पर्वतावर अनेक सौंदर्यस्थळें आहेत आणि यात्रेकरूला वेळ असल्यास त्यानें अवश्य सावकाशपणें हिंडून तीं बघावीत, खचितच दृष्टीचें पारणें फिटेल. हें एक थंड हवेचें ठिकाण आहे आणि प्रतिवर्षी वर्षातून कांहीं महिने येथें येऊन राहण्याची तुमची इच्छा असेल तर तशीही सोय तुम्हाला करता येते. तुम्ही पांच हजार रुपये दिलेत तर देवस्थान तुमच्या नांवानें एक टुमदार चार-पांच खोल्यांचा आधुनिक सुखसोयींनी युक्त असा बंगला बांधून देते, व वर्षांतून तीन महिने तुम्ही तेथें येऊन राहूं शकता. बाकीच्या दिवसांत देवस्थान तो बंगला भाड्यानें देऊन उत्पन्न देवस्थानांत जमा करते.

या पर्वतश्रेणीवर अनेक लहानमोठे झरे आणि धबधबे आहेत. प्रत्येक ठिकाण एक एक सौंदर्यस्थळ आहे. पापविनाशनम्, आकाशगंगा इत्यादि धबधब्यांखालीं असंख्य यात्रेकरू आंघोळ करीत असतात.

यात्रेकरू अगर प्रवासी या ठिकाणीं आला म्हणजे त्याला पहाण्यासारखें काय आहे हें सांगून झालें पण त्याला काय काय दिसतें याचेंही जर थोडेसे वर्णन केलें नाहीं तर तिरुपति महात्म्य पुरतें होणार नाहीं.

तिरूमलैला बसमधून उतरल्यावर मंदिराकडे जाऊं लागलें म्हणजे डाव्या हाताला एक मोठा हॉल दिसतो. हॉल कशासाठीं आहे हें निरक्षर लोकांनाहीं स्पष्ट कळावें म्हणून प्रवेशद्वारावर दुरूनहि सहज दिसतील इतकीं मोठीं रंगीत चित्रें आहेत. ज्यामध्यें नापिक एका बाजूला पुरुषाचें व दुसऱ्या बाजुला स्त्रीचें मुंडन करीत असल्याचें दाखविलें आहे.

• ( पान १६ वर )








श्री. श्रीराम आचवल, पुणें.

**प्रश्न : 'देव भावाचा भुकेला'—म्हणजे कोणत्या भावाचा ?**

**उत्तर :** सापत्नभावाचा.

**प्रश्न : 'विश्वचि माझें घर' असें कोणी म्हटले आहे ?**

**उत्तर :** कुणा निर्वासितानें.

**प्रश्न : स्त्री मांजराला कां भिते ?**

**उत्तर :** प्रतिस्पर्धी म्हणून.

श्री. कमलाकर शांताराम काठे, उरण.

**प्रश्न : मनुष्यानें जास्त प्रेम कुणावर करावें ?**

**उत्तर :** स्वतांवर !

**प्रश्न : महाराष्ट्रीय मनुष्याला टक्कल उच्चारसुद्धां न करणारे हल्लींच शिवाजीचा पवाडा उदोउदो कां करतात ?**

**उत्तर :** राजा कालस्य कारणम्.

श्री. दत्ता झगडे, उमरखाडी, मुंबई.

**प्रश्न : जीवनाचें खोबरें कसें होतें ?**

**उत्तर :** परिस्थितीच्या झंझावातानें मानवी वृक्ष हेलावल्यामुळें अधःपतित झालेला 'नारीकेल' फुटून हातांत जेव्हां करवंटी येते तेव्हां जीवनाचें खोबरें होतें.

**प्रश्न : मनुष्यास माणुसकी आणण्याचा मार्ग कोणता ?**

**उत्तर :** दाममार्ग.

**प्रश्न : प्रेम कोणावर करावें ?**

**उत्तर :** देवावर आणि दिव्यावर.



वाचकांना अडलेल्या चमत्कारिक प्रश्नांना उत्स्फूर्त उत्तरें देण्यासाठीं प्रस्तुत सदराची योजना सुरू झाली आहे. मराठी साहित्यातले एक अष्टपैलू लेखक वाचकांकडून येणाऱ्या प्रश्नांस उत्तर देण्यास सिद्ध झाहले आहेत. मात्र ह्या शरसंधानामुळें वर्मी घाव बसल्यास त्याचें पाप माथीं नको म्हणून तूर्त अनामिक अवस्थेंतच त्यांनी हें कार्य पत्करलें आहे. वाचकांनीं आपले सुबोध प्रश्न सुवाच्च अक्षरांत लिहून पाठवावे. अवाच्य प्रश्नांना उत्तरें दिलीं जाणार नाहींत.





पडलें तर त्याला त्याची खंत वाटून तें नाहींसें करण्यासाठीं तो पैसे खर्च करतो पण जर गुजराथी अगर मारवाडी मनुष्याला टक्कल पडलें तर तो काय करील ?

**उत्तर :** टक्कलाचें भांडवल करील.

**प्रश्न : वाङ्मयांत करुण स्त्रियांचीं वर्णनें जास्त कां असतात ?**

**उत्तर :** औषधांत अधिकांश रेचक असावें ह्याच न्यायानें !

**प्रश्न : ह्या जगात प्रेम नसतें तर काय झालें असतें ?**

**उत्तर :** ह्या जगांत प्रेम नसतें तर कवि आणि काव्य, चंद्र आणि मुखचंद्र, हृदय आणि हृद्रोग आणि पुरुष आणि स्त्री ह्यांचें महत्त्व उरलें नसतें.

कु. कमल कुळकर्णी, ठाणें

**प्रश्न : पूर्वी शिवाजीच्या नांवाचा**

कु. यशवंत वामन काठे, उरण.

**प्रश्न : ह्या जगात ज्या वस्तूला पैसे पडत नाहींत अशी वस्तू कोणता ?**

**उत्तर :** भीक.

**प्रश्न : सतीचा चाल आजही सुरू असती तर काय झालें असतें ?**

**उत्तर :** विम्याचा धंदा बसला असता !

**प्रश्न : पहिलें अंडे की पहिली कोंबडी?**

**उत्तर :** पहिला कोंबडा.

**प्रश्न : गुळगुळीत टक्कल बुद्धिमान माणसालाच पडतें. मग स्त्रिया बुद्धिमान नसतात काय ?**

**उत्तर :** असतात. म्हणूनच त्या गंगावन वापरतात.

कु. उषा रघुनाथ कर्वे, पापडी.

**प्रश्न : रसिक वाचकांनीं पाठविलेला मनी ऑर्डर पाहोंचला कीं नाहीं ?**

**उत्तर :** मनिऑर्डर 'अनामिकास' पाठ-

वली असल्यामुळें तीं परस्पर संपादकांनी साभार स्वीकारली असें कळतें.

**प्रश्न : अर्वाच्य प्रश्न म्हणजे काय ? एक उदाहरण द्या !**

**उत्तर :** जो सुवाच्च नाहीं तो ! उदाहरणार्थ, ×××××?

**प्रश्न : बायकांना मोठ्या अंबाड्याचें भूषण कां वाटतें ?**

**उत्तर :** दुरून डोंगर साजरे !

**प्रश्न : बेसुमार जाडी कमी करण्याचा सुलभ उपाय कोणता ?**

**उत्तर :** सरकारी 'टोन्ड' दुधाचा रतीब.

**प्रश्न : ह्या सालांतील उत्तम कादंबरी कोणती ?**

**उत्तर :** सरकारी तज्ज्ञांच्या मतें कोणतीही नाहीं.

**प्रश्न : आजच्या तरुणींना लोकांच्या नजरा प्रिय असतात तर पुरुषांना काय प्रिय असतें ?**

**उत्तर :** जर्जरा !

**प्रश्न : पुरुषांना आपल्या पत्नीपेक्षां दुसऱ्या तरुणींचे गुण गाण्याची खोड असते ती कां ?**

**उत्तर :** 'अतिपरिचयात् अवज्ञा' ह्या न्यायामुळें.

**प्रश्न : कळावें ! लोभाची अपेक्षा नाहीं—**

**उत्तर :** इथं कुणा लेकाचं अडलंय् !

**श्री. यशवंत केशव जांभेकर,** पापडी.

**प्रश्न : स्त्रींत व घड्याळांत फरक काय ?**

**उत्तर :** घड्याळाला चावी द्यावी लागते. स्त्री आपोआप चालते.

**प्रश्न : आपलें सरकार कोठें रहातें ?**

**उत्तर :** राज्यघटनेंत.

**श्री. महेश सी. आंबेगांवकर,** शियाबाग, बडोदें.

**प्रश्न : एखादी व्यक्ति एखाद्या प्रसंगीं घाबरल्यास तिला शौचाची भावना होतें ह्याचें कारण काय ?**

**उत्तर :** असाध्य तें साध्य करितां सायास। कारण भयास तुका म्हणे ॥

**श्री. हरी पंढरीनाथ,** बडूर.

**प्रश्न : संसाराच्या तापानें पोळलेल्या माणसांना काय वाटतें ?**

**उत्तर :** आपल्या शिरावर छत्र असतें तर किती बरें झालें असतें ! ●●●

---

(पान ३६ वरून)

विधवा स्त्रियांचें केशवपन करण्याची प्रथा महाराष्ट्रांत गेल्या पिढीपर्यंत होती आणि त्या प्रथेचे निर्मूलन करण्याकरितां ह. ना. आपटयांनी 'पण लक्षांत कोण घेतो.' सारख्या कादंबऱ्या लिहिल्या- स्त्रीला अशाप्रकारें विद्रूप करणें हा सामाजिक अन्याय समजला जात होता. तो समाजाचा एक कलंक मानला जात होता. इथें तिरुपतीला सुवासिनी स्त्रिया सुंदर आभूषणें घालून आणि उंची रेशमी वस्त्रें नेसून डोक्याचें मुंडन करून रूपगर्वितेसारख्या मिरवतांना बघितल्या म्हणजे 'भिन्न रुचिर्हि लोकाः' या उक्तीमधील भीषण सत्याची प्रचीती येते.

व्यंकटेशाचें दर्शन करण्यापूर्वी व्यंकटेशाला आपले केस अर्पण करण्याची प्रथा दक्षिणेंत आहे व कित्येक लोक सहपरिवार येऊन स्त्रिया, पुरुष, मुलें–मुली सर्व मुंडन करून घेतात. सतरा अठरा वर्षांच्या माता आपल्या तान्ह्या मुलाचें व आपलें मुंडन करून घेतलेल्या बघितल्या म्हणजे कळवळल्यासारखें होतें आणि ती श्रद्धा, ती महान शक्ति जी हें सर्व करायला लावते तिचा अर्थच कळेनासा होतो.

क्षौर कर्म करणाऱ्या नापितांचा येथें संघ आहे व त्या संघानेंच हॉल बांधलेला आहे. क्षौर विधीसाठी दर डोई चार आणे आकार घेतात आणि त्यांतला ठराविक हिस्सा देवस्थानला द्यावा लागतो. देवाला अर्पण केलेले केस गंगावनात रूपांतरित होऊन बाहेर विकायला बसलेले असतात. पूर्वी टाईम्समध्यें माझ्या वाचनांत आलें होतें कीं या केसाची फार मोठ्या प्रमाणावर अमेरिकेंत निर्यात होते आणि भारताला हे केस डॉलर मिळवून देतात. कदाचित् अलीकडे नायलॉनचे केस व टोप तयार होऊं लागल्यामुळें या केसांना परदेशांतून मागणी नसावी. कारण हल्लीं हीं गंगावनें विकणारांची संख्या खूपच वाढली आहे व गंगावनांच्या किंमतीपण खालीं आल्या आहेत.

श्रद्धायुक्त अंतःकरणाचे हें विशाल दर्शन आणि आधुनिक व्यापारी युगांतला व्यवहारीपणा याचें हें विचित्र मिश्रण बघितलें म्हणजे मनुष्य किंकर्तव्यमूढ होतो. जगांतलीं मूल्यें नाहींशी होत आहेत म्हणून आपण आक्रोश करीत आहोत, पण एकीकडे श्रद्धेचें हें अनाकलनीय रूप बघितलें म्हणजे कांहीं समजेनासें होतें.

दुसरें डोळ्यांना सलणारें, खुपणारें दृश्य दिसतें तें कुठल्याही तीर्थाच्या ठिकाणीं दिसणारें नेहमीचेंच. असंख्य भिकारी ! असंख्य म्हणजे ज्यांची संख्या शेकड्यानें मोजतां येणें केवळ अशक्य आहे. हजारांनींच त्यांची संख्या मोजली पाहिजे. पापविनाशनम् धबधब्याकडे कांहीं पायऱ्या चढून जात असतां तेथें प्रत्येक पायरीवर दुतर्फा इतके भिकारी बसले होते की मधून चालणें कधींकधीं अशक्य होत होतें. शारीरिक विकृतींचे इतके नमुने आणि भिक्षा मागण्यासाठीं त्या विकृतींचें किळसवाणें प्रदर्शन पाहून मनांत आलें, या बिचाऱ्यांच्या पापाचें परिमार्जन व्यंकटेश कधीं करणार नाहीं कां ? परमेश्वराकडूनसुद्धां पापाचे परिमार्जन करून घ्यायला दानाची फी द्यावी लागते. पापविनाशनम् धबधब्याखालीं पापांतून मुक्त व्हायला असंख्य लोक स्नान करीत असतात मग त्याच पापविनाशनच्या तुषारांनीं सिक्त होत तिथें बसलेल्या या हजारों पाप्याची का बरें ही दशा ?

शेषाद्रीसारख्या निसर्गरम्य ठिकाणीं उत्कृष्ट शिल्पकृती निर्माण करणाऱ्या पूर्वजांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच. पण आज तिरुपति म्हणजे निसर्गाचा वरदहस्त असलेला शेषाचल, तिरुपति म्हणजे भारतानें ज्याचा गर्व करावा असें उत्कृष्ट शिल्प, तिरुपति म्हणजे श्रद्धेचा महापूर, तिरुपति म्हणजे मनुष्याच्या दातृत्वाची परिसीमा आणि त्याबरोबरच तिरुपति म्हणजे श्रद्धायुक्त अंतःकरणानें येणारे दरिद्री भारताचे असंख्य अर्धनग्न स्त्री–पुरुष, उघडीं–नागडीं मुलें, अज्ञाणी–अशिक्षित स्त्रिया, हजारों लुळे–पांगळे आणि उपेक्षिलेले रोगी. तिरुपतीचें पहिलें चित्र दुसऱ्या चित्राच्या चौकटींत बसलेलें आहे ही चौकट बदलणें मनुष्याच्या हाती नाहीं कां ? आपण अज्ञानांत असेंच वळवळत राहणार कां ? आपली श्रद्धा कधीं डोळस होईल का ?

तिरुपतीचें दर्शन घेतल्यावर 'व्यंकटेश्वरा तुझी लीला अगाध आहे' असे उद्गार निघण्याऐवजी सहजच तोंडातून शब्द आले 'what man has made of man !' ●●●








एक पानी कथा

# एक पिस्तुल आणि एक तरुणी

'डेक्कन क्वीन'नें खडकी सोडलं आणि मग तो झुळझुळ करूं लागला. त्याच्या डाव्या अंगाला घाऱ्या डोळ्यांची एक गोरीपान तरुणी शांतपणें पुस्तक वाचण्यांत दंग होती. त्या डब्यांत फक्त ते दोघे होते. त्यानें डाव्या खिशांत ठेवलेलं आपलं पिस्तुल चांचपून पाहिलं. तें व्यवस्थित होतं. हे पाहून तो हळूच तिच्याजवळ सरकला. कसला तरी विचार करण्यांत तो दंग झाला होता.

त्याचं मन बेचैन झालं होतं त्याचं कारण एवढंच होतं कीं पुण्याच्या एका बँकेंत नोटांची चवड मोजीत असलेल्या एका माणसाचा त्यानें खून केला होता. व ते पैसे घेऊन तो आतां पुण्याबाहेर पळून जात होता. वास्तविक पाहतां त्या माणसाचा खून करण्याचा त्याचा इरादा नव्हता पण तो सहजासहजी पैसे देईना म्हणून त्यानें त्याचा खून केला! पोलीस त्याच्या मागे लागले पण त्यांच्या डोळ्यांत धूळ फेकून तो 'डेक्कन'मध्यें चढला. पोलिसांनीं आतां थेट मुंबईपर्यंत खबर दिली असणार, हेही तो जाणत होता. कोणी सांगावं ह्या गाडींतही गुप्त हेर असतील.

लोणावळ्याला उतरण्याचं त्यानं ठरविलं. पण तो एकटा उतरला तर पोलीस त्याच्याकडे संशयी नजरेनें पाहतील पण तो दुकटा उतरला आणि तेही एका स्त्रीबरोबर तर पोलीस 'नवरा-बायकोचं जोडपं आहे' म्हणून नक्कीच त्याच्याकडे दुर्लक्ष करतील. तो मग सहज लोणावळ्याला आपल्या साथीदाराच्या घरीं जाऊं शकत होता!

हा विचार त्याच्या मनांत येतांच त्यानें पुन्हा त्या तरुणीकडे पाहिलं. लांब सडक केसांची ती तरुणी वाचण्यांत अगदीं दंग होऊन गेली होती.

'लोणावळा' यायला आतां फक्त अर्धा तास उरला होता. त्या तरुणीला तो चटकन् म्हणाला, 'पेन्सील आहे का हो आपल्याकडे?' पुस्तकांतून नजर काढून आपले घारे डोळे त्याच्यावर रोखीत ती म्हणाली, 'आहे!' असं म्हणून आपल्या पर्समधून पेन्सिल काढून तिनें ती त्याला दिली व पुन्हां ती वाचनांत दंग झाली.

त्यानें झटकन् एका कागदावर लिहिलं, 'तुम्हांला माझ्याबरोबर लोणावळ्याला उतरायला लागेल व आपण दोघें नवरा-बायको आहोंत असं भासवलं पाहिजे. तुम्हीं गप्प रहा. बोलण्याचं सगळं काम मी करीन!' तिची पेन्सिल त्यानें तिला परत दिली व मग ती चिठ्ठी तिला देत तो म्हणाला; 'ही वाचा!' तिनें ती वाचली व शांतपणें पुस्तकांत ठेवून दिली. मग ती त्याच्याकडे टक लावून पाहूं लागली. बराच वेळ तिनें त्याला न्याहाळलं पण तिनें एका शब्दानेंही त्याच्याशीं बिलकुल संभाषण केलं नाहीं. तिचा हा 'मूक अभिनय' पाहून त्यानें आपल्या डाव्या खिशांतील पिस्तुल बाहेर काढलं व तिला दाखवलं. 'गडबड केलीस तर ह्यानें खून करीन' असं जणूं काय त्याला सुचवायचं होतं. पण ती पिस्तुल बघूनही घाबरली नाहीं. त्यानें पिस्तुल परत खिशांत ठेवलं. पुन्हां थोडावेळ एकमेकांनीं एकमेकाला 'पाहून' घेतलं! मग ती लगबगीनें उठली व खिडकी बंद करीत म्हणाली, 'वारा फार आहे बाई!' हे करतांना गडबडींत ती त्याच्या अंगावर कोसळली पण लगेच उठून सांवरली व म्हणाली, 'क्षमा करा हं मला. तोल गेला बाई!' त्यानें तिला क्षमा केली व विचारलं 'कुठली गोष्ट वाचत होता?' तिनें मग त्याला ती गोष्ट सांगितली. त्या गोष्टींत असं होतं कीं एक खूनी माणूस गाडींतून प्रवास करीत होता व तो आपल्या शेजारी बसलेल्या माणसावर पिस्तुल रोखणार इतक्यांत त्याला कळलं कीं त्याच्या खिशांतून त्याचं पिस्तुल नाहीसं झालंय म्हणून!

ही गोष्ट ऐकतांच त्यानें दचकून आपला डावा खिसा चांचपला. तो खिसा रिकामा होता! त्यानें त्या तरुणीकडे पाहिलं. पाहतों तों ती त्याच्यावर पिस्तुल रोखून उभी होती. ते त्याचंच पिस्तुल होतं. ती त्याच्यावर किंचाळली, 'गडबड करूं नकोस! लोणावळा आलेलं आहे!'

●●●

: अनुवादक :
दि. श्री. कराडकर










• **ओझरते स्वर**

— केशव मेश्राम

• **पुढचें पाऊल**

— केशव मेश्राम

• **जुनी परंपरा**

— श्रीकृष्ण ठाकूर

### ओझरते स्वर

## स्वगत

**कुसुमाग्रज**
कॉन्टिनेन्टल प्रकाशन : पुणें.
**किंमत : साडेतीन रुपये.**

'काढ सखे गळ्यांतले
तुझे चांदण्यांचे हात
क्षितिजाच्या पलिकडे
उभे दिवसाचे दूत'

ह्या ओळी लिहिणाऱ्या श्री. वि. वा. शिरवाडकर यांच्या कवितेचा सगळा घाटच 'स्वगत' ह्या त्यांच्या सहाव्या कविता संग्रहांत बदलून गेलेला दिसतो. आत्मपरता सोडून देऊन कुसुमाग्रजांची कविता सामान्यांच्या सुखदुःखाची दादफिर्याद घेतांना दिसते. माणसांच्या अगतिकतेच्या तीव्र जाणिवेमुळें विषण्ण होऊन कुसुमाग्रज लिहिताहेत असें वाटते. 'कचकड्यांच्या बाहुल्यांचा, प्लास्टिकच्या रंगीत खेळण्यांचा हा सारा संसार चिरडणाऱ्या निर्दय गतिबद्दल अभावितपणें कुसुमाग्रज बोलतांना दिसतात.

'आकाशरसाने भरलेल्या
वाङ्मयाच्या कुंभापुढें !
ती थांबणार नाहीं अशी
अगतिक ग्वाहीही ते देऊन मोकळे होतात.
'इतिहासाचा हिरवा काळा द्रव'

'उसवलेल्या थडग्यांतून बाहेर स्रवणारा काळोख' अशा दुसरीकडे कुठेही आढळणाऱ्या ओळींचीही आबादी 'खुलदाबाद' सारख्या कवितेत प्रकर्षानें आढळते.

असें जरी असले तरी कांही ठिकाणी कुसुमाग्रज अभावितपणें प्रगट होतात.

'तुझ्या अधर कपोलावरील उषःकाल
टिपून घ्यावे ओठांनी
तेहिं असें...'तेहिं असें' ही कविता किंवा

क्षितिजाच्या काळोखाला
फुटे सुवर्णाचे पान
आकाशाच्या ओंजळीत
पडे किरणांचे दान
...'लाट तेजाची'

ह्या ओळी वाचतांना तारा झुलूं लागतात. ओळखीच्या पाण्याची मंद कां होईना पण खळखळ ऐकायला येऊं लागते आणि—

छंद मला प्रवासाचा
हृदयाच्या मुलखांत

आडमाप मुशाफरी करण्याचा '...छंद' अजूनही कायम असल्याने मन हरकते. ह्या मुशाफरीचा लवकरच शेवट होऊं नये असेच वाटते. हेंच सूत्र 'पणती' ही कविता वाचतांना सांपडते व त्यांतील 'अशा अभावी वहात येते तंव हांकेची पणती' ह्या ओळी मनांत शिरतात तेथेच रेंगाळूं लागतात.

'स्वगत' मध्यें कुसुमाग्रज बहिर्मुख झाले असल्याने त्यांना मुक्तछंदांत लिहावे लागले. 'स्वगत' मधली आत्मपरता कुठें फारशी प्रत्ययाला येतच नाहीं. व 'अंधार' ह्या कवितेतील—

'काय हवें ते मला कळेना
कुठें असें तें मज गवसेना
काय कुठेच्या घनअंधारी
जें आहे तें–तेंहि दिसेना...'

ह्या ओळींतील व्यथा मला वाटते सामान्यापेक्षांही कुसुमाग्रजांचेच मन व्यक्त करीत असाव्यात. त्यापुढेच 'दिवसाचा गुण प्रकाश आहे.' असें गद्य सिद्धान्त रुक्षपणें सांगणारी 'स्वधर्म' ही कविता वाचली कीं, ह्या अनुमानास बळकटी येते.

'स्वपेक्षां समष्टीकडेच ते जास्त झुकलें आहेत. 'बापू गोखले', 'बाजीराव', 'शिवाजी' ह्या महापुरुषांना त्यांनी अभिवादन केलें आहे तर 'ताजमहाल', 'सांची', 'कैलासलेणें' व 'औरंगाबाद' आदि स्थळांचे महात्म्य वर्णन केलें आहे. काळासोबत हातमिळवणी करूनच त्यांनी आपल्या मुसाफरीला अर्थात ह्या 'नव्या' मुसाफरीला आरंभ केलासा दिसतो.

जीवनलहरी, 'विशाखा' ह्यांतील शब्दशिल्पांचा आठव झाला कीं, कांहीतरी चुकल्यासारखें, हरवल्यासारखें वाटते आणि रसिक उद्‌गारतो, 'तुला गायचे होते तेव्हां मलाही होतें ऐकायचें' ...'गीत' पण 'स्वगत' वाचतांना–ऐकतांना 'कांही ओझरते स्वरच' ऐकूं येतात असे अनिच्छेने म्हणावे लागते.

× × ×

### पुढचें पाऊल

## पुनवेचा थेंब

**मधुकर केचे**
पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७.
**किंमत ४ रुपये**

स्वतःचें वैशिष्ट्य लाभतां लाभताच कांही कवि, कवि म्हणून बाद होतात. पण श्री. केचे मात्र पुढें आले, तेंच मुळीं स्वतःचें वेगळेपण घेऊन आणि हें आगळेवेगळेपण म्हणजे त्यांच्या अभंगांतून होणारा सच्चा आविष्कार. 'दिंडी' नुसत्या अभंगांनी नटली होती तर 'पुनवेचा थेंब' भरगच्च अशा त्यांनी सादर केला आहे. त्यांच्या पहिल्या संग्रहानंतर एक पाऊल आणखी पुढें पडलेलें आढळतें.

संग्रह वाचतांना एक गोष्ट सहजच लक्षांत येते कीं, श्री. मधुकर केचे शब्दांच्या भुलभुलैयांत अडकत नाहींत. तर त्यांना जें सांगायचे असते व जसें सांगायचें असतें तेंच आणि तसेंच कवितेच्या रूपांत बाहेर पडते.



अनुक्रमणिका






'नातें कळण्याच्या आधीं
जुळे तुझी माझी व्यथा
हाच आपुला एकोपा
माझ्या लेका किंवा बापा'--'भेट'

असें जेव्हां ते बेधडक बजावतात तेव्हां तुकोबाचा जोष त्यांच्या वाणींत येतो. तर...

'साय पांघरून
दूध गेलें झोपीं
तशी धापाधापीं थांबो माझी'–'आण'

ह्या ओळी वाचतांन मुक्ताईचा लडिवाळपणा त्या व्यक्त करतात तसेच

मीहि असा पिसा
पुरुष असून
दूध छातींतून सांडो पाहे ह्या। 'नातें'

ह्या कवितेतील ओळींतील समर्थ अनुभवाने थरारून जायला होतें.

इतकें समर्थपणें सांगता येत असूनही त्यांच्यांत पुरेसा विनय आहे. आपल्या शब्दाला अर्थाचें डोळस रूप येईल कीं नाही ह्याबद्दल त्यांच्या मनाला हुरहुर लागलेली दिसते. ह्या मागचा सूत्रधार कोण ? हें सारें करायला कोण लावतो ? असे सनातन प्रश्न त्यांना पडतात आणि ह्या अशा प्रश्नांच्या पिंग्यांत फिरतां फिरतांच त्यांच्या शब्दांना वजन येऊं लागतें.

कोणाच्या सांगीने
चालली ही वारी
शद्द आतां तरी अर्थेल ना ?--'लेखन'

ह्या ओळी आणि

किती आवरावें मन ?
किती लुचावा शेंदूर ?
एका मनासाठीं घ्यावें
कोणा कोणाशीं मी वैर–'हारवतां'

अशा ओळी ह्याच अवस्थेंतून आकारल्या आहेत.

केच्यांच्या अभिव्यक्तीला प्रामाणिकपणासोबतच सोपेपणाचीही गत मिळाली आहे. वाचतां वाचतां शद्वांची लय मनांत भिनूं लागते. शद्व आणि भावना हा भेदच उरत नाही आणि तें एक अविच्छेद अंग म्हणून उरतें.

'अब्रू' ही फक्त चारच ओळींची कविता पण तिचें अस्तित्व अवकाशभर पसरलें आहे, 'नभाला वाचा' फुटून 'सर्व प्रसंगच अक्षरला' आहे.

केच्यांची 'मीरा' समुत्सुक आहे. वाट पाहणारी आहे. प्रतीक्षेंत तिला सुख आहे.

'संध्यामीरा, मदीर नयना' अशी मीरा पाहत असतांनाच...

'संध्याराधा तांबुसगोरी उन्मदपद गतिमंद
यमुनास्नाना धापत आली जपत मनीं गोविंद'

...'मीलनक्षेत्र, ह्या कविवर्य बोरकरांच्या चित्रांतले रंग बोलके होऊं लागतात.

प्रस्तुत 'थेंबां'त वेगळ्या म्हणून खास 'पीरवाडी' आणि 'झिंग्या भोई' ह्यांचा उल्लेख करावा लागेल. 'पीरवाडी' धूसर वातावरणांत उभी आहे. 'अजूनही पुरेसें उजाडलेलें' नसल्याने त्या 'मातीचे सुतक' उदास करून सोडते.

'ती सुतकी माती झांकत अंग तृणांत
थडग्यांची अंडी उबवित बसली होती'

अशा केवळ वर्णन करणाऱ्या पण तरीही खेंचून घेणाऱ्या 'पीरवाडीतील महंमदाची 'इब्लिस बातमी' ऐकण्यासाठीं मन ओढावते.

'म्होतुर–वेडा' 'झिंग्या भोई' अस्सल वऱ्हाडी आहे. हें एक कथाकाव्य आहे. डोमा भोयाच्या रेनीशी म्होतुराचे मनसुबे रचणारा हा भोईराजा शेवटी भर वाटेवर तमाशांतल्या शिरकिस्नापरी शिरजोरी करण्याइतका मुजोर होतो. पुराने फणकारीत येणारी वर्धा

रोषाने फुगलेली वरधा
रोखत शिंगें सर्व जगावर
डाकीनीने झपाटलेलें
भरतीचे हें वेड अनावर

अशी दुथडी भरून वाहत आहे. ती डोळ्यापुढें येते आणि ह्या कथेतला आकांत चित्र बनून हांका मारूं लागतो.

वऱ्हाडी लोकगीतांचा खास ढंग 'रंग' ह्या कवितेत आहे.

एक रंग झेलूं गडे
दोन रंग झेलूं
श्रीरंगच झेलूं जातां
देह कसा तोलूं ?

ह्या ओळी वाचत असतांनाच टिपऱ्यांचा ताल, पायांचे आवर्तन आणि फिरण्याचा वेग जाणवतो.

अर्थात एकादी नुसत्या शब्दांतच विरणारी 'झुळझुळ वारा, वाऱ्यामधुनि वाहे गोदावरी' अशी कविता 'उरतें गाणें तरी' थेंबातही आढळते.

'दिंडी' मध्यें त्यांनींच व्यक्तविलेल्या

'झालो असती त्रिवेणी
माझें घर आड आले'

ह्या उद्गारांची 'थेंबां'त पूर्ति आहे. 'काय खरें मग ? काय खरें मग ?' ह्या प्रश्नांचे उत्तर ह्या संग्रहांतील कवितांच्या सच्चेपणांत सांपडते.

'दिंडी गेली पुढें' ह्या पहिल्या संग्रहाला तसेच 'पुनवेचा थेंब' ह्याला मिळालेल्या सरकारी पारितोषिकांनी ह्यांतील खरेपणाचा योग्य तोच सत्कार केला असें म्हणावें लागतें.

**—केशव मेश्राम**

× × ×

<u>**जुनी परंपरा**</u>

## *अर्चना*

### शरच्चंद्र सिन्हा

[ यशवंत प्रकाशन, पुणें. किं. रु. ५ ]

हरिभाऊ आपटे, वि. सि. गुर्जर यांच्या परंपरेतील या कथा. आजची लघुकथा कशी आटोपशीर, तंत्रानें आणि मंत्रानें बद्ध अशी असते. एखादा दुसरा प्रसंग आणि एकच एक परिणाम मनावर करूं पहाणारी आजची कथा श्री. सिन्हा यांना वर्ज्य दिसते. त्यांच्या या कथा म्हणजे छोट्या छोट्या कादंबऱ्याच वाटतात.

मात्र या लिहिण्यांत शंभर टक्के जिव्हाळा आहे. आपुलकी आहे, तळमळ आहे आणि त्यामुळेंच कथा वाचावयास घेतली कीं खालीं ठेववत नाहीं. शरच्चंद्रांचे भाषेवरहि प्रभुत्व आहे. क्वचित् ओघांत येणारें वऱ्हाडी शब्द मजेदार वाटतात.

अर्चना हा अजोड नसला तरी आगळा कथासंग्रह आहे व तो प्रत्येकानं वाचावा इतका झक्क आहे.

**—श्रीकृष्ण ठाकूर**

● ● ●











*' हा जिवंत असेपर्यंत कुणीहि सुखाची अपेक्षा करूं नये ' याज्ञसेनीचे हे उद्गार युधिष्ठिराच्या एकंदर जीवन यात्रेचीं जणुं फलश्रुती दर्शवित नाहीं काय ? खुद्द जन्मदात्रीहि असेंच म्हणते, कीं...*

# हा पुत्र नाहीं मलमूत्र आहे

धर्मे सति कुतः सुखम् : ७

## धर्मराज जिवंत असतां सुखाचें नांव कशाला ?

No man is a hero to his valet अशी एक म्हण आहे. मनुष्य बाह्यात्कारीं कितीही मोठा असला तरी त्याची खरी किंमत त्याच्या निकटवर्ती माणसानांच माहीत असते. लाख श्लोकांच्या महाभारतांत दिसणाऱ्या युधिष्ठिराच्या वादग्रस्त जीवनाचा सुसंगत अर्थ लावण्यासाठीं परलोकावर एक डोळा ठेवणाऱ्या पद्धितांची शतकानुशतकें आटापीट चालू आहे. पण हा खटाटोप करीत असतां युधिष्ठिराच्या निकटवर्तीयांची त्याच्याबद्दल काय मतें आहेत याचा कोणी विचार करीत नाहीं.

जिच्या समजूतदारपणाबद्दल, त्यागशीलतेबद्दल, पातिव्रत्याबद्दल चुकूनही संशय घेण्याची जरूरी चिकित्सक माणसासुद्धां वाटणार नाहीं अशा सहनशील आणि सत्वशील सती द्रौपदीनें युधिष्ठिराबद्दल म्हटलें आहे कीं तो जिवन्त असेपर्यंत कोणासही सुखाची आशा करावयास नको.

द्रौपदीच्या मुखांतून असे उद्गार बाहेर पडावे यावरून युधिष्ठिराच्या एकंदर जीवनयात्रेची ऐहिक यशस्विता आणि फलश्रुती स्पष्ट कळून येते. ज्या पुण्यशील माउलीच्या शब्दास जवळ जवळ वेदवाक्याची किंमत प्रत्यक्ष श्रीकृष्ण देतो, त्या साध्वीच्या मुखांतून हे उद्गार ज्या युधिष्ठिरानें वदविले त्याचा पराक्रम काय बरें वर्णावा !

द्रौपदी ही द्रुपद राजाची लाडकी कन्या. तिच्यासारखी सुंदर तीच. तिच्यासारखी साध्वी तीच. प्रत्यक्ष कुबेरही तिला एका पायावर पत्नी म्हणून स्वीकारता आणि आमरण शिरीषाच्या सुकुमार फुलासारखी जोपासता. तिच्या अंगाचा नैसर्गिक सुगंध आसमंत कोंदत असे. तिचें लावण्य पहातांच प्रत्यक्ष मदन विरघळत असे. अशी ही भुवनवंद्या रमणी युधिष्ठिराच्या हातीं आल्यावर त्यानें तिच्यासाठीं जे सुखाचे पर्वत उभे केले त्यांचे वर्णन काय करावे !

तिचें पतिगृहीं पहिलें गमन झालें तें पायींच. एवढेंच नव्हे तर या वरातीच्या वेळीं पतींनी सुध्दा मृगचर्माचें ओझें तिच्याच शिरावर दिलेलें होतें. वरगृहींचें पहिलें भोजन या राजकुमारी वधूला मिळालें तें भिक्षा मागून आणलेल्या उष्ट्याचा बारावा भाग. त्यानंतर शयन मिळालें तें पांच पतींच्या पायांखालीं, जणूं काय त्यांच्या पायांना तकिया असावा त्याप्रमाणें.

यानंतर विधिवत् विवाहाचा प्रसंग आला तेव्हां ज्याच्यासाठीं पित्यानें तिला नियुक्त केली होती, ज्यानें तिला जिंकली होती आणि जो तिला आवडला होता अशा पतीशीं युधिष्ठिरानें तिचा विवाह होऊं दिला नाहीं. उलट ज्याच्यामधून प्रचंड तपस्येनें केवळ तीच म्हणून पार पडूं शकली असें आक्षेपार्ह जीवन त्यानें कायमचें तिच्या नशिबीं बांधलें.

नंतर तिच्या आवडत्या पतीनें खांडववनांत नाग लोकांना जिंकून त्याला राज्याचें स्वरूप दिलें, युधिष्ठिर त्या राज्यावर आरूढ झाला, आणि त्यानें अर्जुनाची वनवासांत रवानगी केली. नंतर तिच्या अर्जुनासह चार नवऱ्यांनी जिंकून आणलेल्या धनाच्या जोरावर युधिष्ठिरानें राजसूययज्ञ केला, आणि त्यांतून उद्भवलेल्या आत्मप्रतिष्ठेंत बेताल जुगाऱ्यासारखें वर्तन करून द्रौपदीस दासी बनवून विटंबविलें.

या विटंबनेंतून तिनें स्वतः त्याची सुटका केल्यावर पुन्हां जेव्हां एकत्र वनांत जावयाचा प्रसंग आला तेव्हांही युधिष्ठिरानें अर्जुनास तिच्यापासून तोडून अस्त्रें आणण्यासाठीं वनवासांतही वनवासी केलें. जयद्रथानें द्रौपदीचा पदर ओढला तेव्हां युधिष्ठिरानें त्याच्यावर दया करून त्याला जिवंत सोडलें.

जी त्रिभुवनसाम्राज्ञी होण्यास उचित अशा द्रौपदीला युधिष्ठिरानें दमडीमोलाच्या सुदेष्णेची दासी बनविलें. सुदेष्णा शौचाला निघाली की द्रौपदीनें पाणी घेऊन जावें, सुदेष्णा स्नानास बसली की द्रौपदीनें कपडे घेऊन बाजूला उभे रहावें. सुदेष्णेची वेणी

घालून तिच्या केसांतील गुंतवळे उचलून टाकावी असा प्रसंग युधिष्ठिरानें द्रौपदीवर आणला.

रंगेल विराटाला द्रौपदीनें उगाळलेलें चंद-नच रुचावें आणि त्याचा कोप होऊं नये म्हणून त्याला हवें तेवढें चंदन उगाळतांना द्रौपदीच्या हाताला घट्टे पडावे, रक्त सांक-ळावें, त्या कोमल करांची चामडी सोलून जावी असा प्रसंग युधिष्ठिरानें तिच्यावर आणला. जिच्या नेत्राच्या इशाऱ्याबरोबर भुवनें डळमळावीं अशी जिची थोरवी त्या द्रौपदीला यःकश्चित सुदेष्णेचें मन सांभाळीत आणि सहदासीच्या चुगलखोरपणाला घाबरत पोट भरण्याचें वैभव युधिष्ठिरानें बहाल केलें.

शेवटीं कीचकानें तिची अब्रू लुटण्याचा प्रसंग आणला. ज्या वेणीच्या मानासाठीं कृष्णानें भारत घडविलें ती वेणी हांसडली. भुवनेश्वराची मांडी ज्यांस वाहून पावन व्हावी, त्या तिच्या पार्श्वभागावर लाथ हाणिली. तिला उपडी पाडून तिच्या ओठांतून रक्त वाहविलें; बोलूं नये तें बोलून दाखविलें. करूं नये ती अश्लील कृती करून दाखविली त्यावेळी हा युधिष्ठिर निष्क्रियपणें हें सारें पहात बसला होता. एवढेंच नव्हे, तर भीमाला कोप अनावर होत आहे असें पाहून युधिष्ठिरानें त्यालाही दटावलें. तेव्हां द्रौपदीचा तळतळाट होऊन ती म्हणाली, ' धर्म जिवंत असतां सुखाचें नांव कशाला ?'

समजा यावेळीं भीमानें प्रकटपणें कीच-काचा वध केला असता आणि जास्तींत जास्त म्हणजे पांडव प्रकट झाले असते तर काय झालें असतें ? फार तर आणखीं बारा वर्षें वनवास वाढला असता. राज्य बारा वर्षें पुढें गेलें असतें. पण जें राज्य यःकश्चित जुव्याच्या डावासाठीं या जुगारी युधिष्ठिरानें घालविलें त्या राज्याची तो आपल्या अब्रूपेक्षां अधिक किंमत करतांना पाहून जी पत्नी त्याच्यासाठीं तिळतिळ झिजली तिचा तळ-तळाट होणार नाहीं तर काय होणार ? जें राज्य धर्मानें जुगारावर लावून उधळिलें, जें राज्य त्यानें पुन्हां दुर्योधनयुद्धांत जुव्यावर लाविले, पुढें तें प्राप्त झाल्यावर जें सोडून तो क्षुल्लक कारणां-साठी शतवार वनांत जावयास निघाला, त्या राज्याची किंमत तो यावेळीं पतिव्रता पत्नीच्या अब्रूपेक्षां अधिक करीत असला होता. अनेक जुव्याचा डाव हा पत्नीच्या बहुमोल शीलापेक्षां अधिक किंमतीचा असें त्यानें आपल्या वर्तनानें सिद्ध केलें होतें. ज्या धर्माचे डांगोरे पिटा-वयाचे त्यानें युधिष्ठिरास ही अंतःप्रेरणा दिली होती. ही युधिष्ठिराची आणि त्याच्या धर्माची केवढी शोकांतिका. ही द्रौपदीच्या पातिव्रत्याची केवढी घोर विटंबना !

स्त्रिया वाटेल तें साहूं शकतात. पण पतीची पौरुषहीनता साहूं शकत नाहींत. द्रौपदीसही ती असह्य झाली. केवळ संस्कारामुळें हा नवरा मरो असे शब्द तिच्या मुखांतून निघूं शकले नाहींत. परंतु ध्वन्यर्थ म्हणून कांहीं असेल तर हा नवरा मरेल तेव्हां सुटका असाच द्रौपदीच्या वचनाचा अर्थ आहे. आणि द्रौपदीनें असें म्हणावें ही युधिष्ठिराच्या जीवनाची फलश्रुती आहे.



## सृष्टा भैक्षाय पांडवा : ८

# भीक मागण्यासाठीं तुझा जन्म आहे

' धर्मस्य तत्वं निहितं गुहायाम् ' हें युधिष्ठिराचें वचन प्रख्यात आहे. त्याचा अर्थ व्यापक धर्माच्या दृष्टीनें जेवढा खरा आहे तेवढाच खुद्द युधिष्ठिर धर्माच्या आचाराच्या बाबतींतही खरा आहे. युधिष्ठिर अमुक एका प्रसंगीं अमुकच एका पद्धतीनें वागला त्याचें तत्वही नेहमीं गुढच राहिलेलें आहे.

जुगार खेळून युधिष्ठिराने आपलें सर्वस्व घालविलें त्यानें आपणास चुटपूट वाटते. आपण म्हणतों एवढ्या मोठ्या माणसाची काय ही अधोगती. मग आपली समजूत घाल-ण्याचा प्रयत्न होतो कीं त्याकाळीं द्यूत हा राजधर्म होता आणि धर्माचें पालन करणाऱ्या युधिष्ठिराला तो खेळणें भाग होतें. आणि एकदां का धर्मचर्चेच्या चक्रव्यूहांत आपण सांपडलो की आपण चकलोंच !

वस्तुतः धर्म जो जुगार खेळला तो कधींही राजधर्म होऊं शकणार नाही. धर्म हा गूढ असतो या युधिष्ठिराच्याच मताप्रमाणें धर्म हा कधीं असा उघडा नागडा असणार नाहीं; शिवाय महाभारतांतच–बायका, जुगार, दारू आणि शिकार ही राजांची चार दुर्व्यसनें होत, असें ठाईठाई निक्षून सांगितलें आहे. जी गोष्ट दुर्व्यसन असते ती धर्म कसा बरें असूं शकेल ? राजे लोक अनंत स्त्रियांशी अनन्वित कामाचार करतात तो धर्म असें कुणी मानीत नाहीं. मद्य पिऊन राजानें रस्त्यावर लोळावे हा राजधर्म असें कोणी मानणार नाहीं. मग पत्नीला जुगारांत पणावर लावावें हा राजधर्म असें कोण म्हणेल ? हें निःसंशय दुर्व्यसन आहे. व्यसन म्हणजे संकट. धर्म तो जो संकटांतून सोडवितो. त्यांत परस्पर विरोध आहे. व्यसन हें कधींही धर्म होऊं शकणार नाहीं. जेव्हां अंधार प्रकाश होईल तेव्हांच व्यसन धर्म होईल. तोवर युधिष्ठिर जुगार खेळला यांत कसलाही धर्म नसून तें त्याच्या व्यसनीपणाचें लक्षण आहे.

आपण नीट विचार केला तर युधिष्ठिर हा जुगारी होता हें पटावयास प्रत्यवाय नसावा. महाभारतांत द्रौपदी अनेकवार त्याला जुगारी म्हणून [illegible] कौरवांसीह [illegible]

वर असलेला एकमेव सज्जन विकर्ण त्याचें वर्णन जुगारी म्हणूनच करतो अज्ञातवासामधें प्रत्येकजण आपणास जमेल तो व्यवसाय करून पोट भरीत असतो. तिथें युधिष्ठिर जुगाराचाच व्यवसाय चालवितो. आपण जुगारी नाहीं आणि शकुनीनें आपणास फसविलें असें युधिष्ठिरानें म्हटल्यास आपण द्यूत रद्द करूं असा निर्णय भीष्मानें दिला असतांना युधिष्ठिर आपण जुगारी नाहीं हें म्हणावयास तयार नसतो. कसा असेल ? आपण जुगारी आहों हें त्याला माहीत आहे. तो तें सिद्धही करीत आहे, कसें तें पहा.

भारतीय युद्धाचा शेवटचा दिवस. कौरव पक्षाकडील एकटा दुर्योधन शिल्लक उरलेला आहे. त्याचा वध झाला कीं हें युद्ध संपलें. विजय झाला. हा विजय प्राप्त होण्यासाठीं कोट्यावधी जिवांची हत्या झालेली आहे. भीष्म, द्रोण असे गुरुजन, दुःशासनादि बांधवजन, शल्यमामादि आप्तजन, यांचा वध झालेला आहे. कोट्यवधी स्त्रिया विधवा झालेल्या आहेत. आर्यांच्या दोन पिढ्या कापल्या गेल्या आहेत. अनेक कुळें निर्वंश झालीं आहेत. हें सारें विजयासाठीं झालें आहे.

हें सारें केलें आहे भीम आणि अर्जुन यानीं. हे सारें करविलें आहे कृष्णानें. पण दुर्योधनाचा वध होईपर्यंत याला कांहीं अर्थ नाहीं, याची जाणीव असल्यानें ते कर्तेकरविते सावधान आहेत; जपून चालत आहेत. पण ज्यानें युद्धांतून पळून जाण्याशिवाय दुसरा नांव घेण्याजोगा पराक्रम केलेला नाहीं असा युधिष्ठिर मात्र विजयाच्या संभवानें शिडशिडला आहे; उन्मत्त झाला आहे; बेभान झाला आहे; त्याची जन्मजात जुगारी वृत्ती खदखदत आहे. त्यामुळें कृष्णार्जुनांची खांडव वनांतील पूर्वीची कमाई जशी त्यानें पूर्वीच्या जुगारांत घालविली तशीं भारतीय युद्धांतील एवढ्या कष्टांची हीही कमाई एका क्षणांत जुगारांत पणावर घालविण्यास तो सिद्ध होतो. तो दुर्योधनास म्हणतो, 'तूं आमच्यांतून कोणा एकासही मार. तुझा माझा पण. आमच्यांतून कोणीही एक मेला तर पराभव आमचा आणि राज्य तुझें.' पुन्हां पुन्हां उसळून तो हा पण लावीत असतो. हा काय राजधर्म आहे ? हा उन्मत्ताचा जुगार आहे. द्रौपदीचा अश्व उपजली जात असतां ज्याचें पौरुष स्फुरत नाहीं तो हा अव्यवहारी जुगारी आतां जुगाराचा पण गर्जत पुन्हां पुन्हां उसळत आहे. तेव्हां धर्म हा जुगारी आहे असा निर्णय निःसंदिग्ध शब्दांत कृष्णानें दिला आहे. कृष्ण म्हणतो,

'धर्मा, दुर्योधनानें तुलाच लढावयास बोलविलें तर आतां काय होणार ? तूं हें दुःसाहस काय म्हणून केलेस बरें ? भीमाकडूनही दुर्योधनाचा पराभव होणें निश्चित नाहीं, अशा परिस्थितींत तूं असें कां बडबडलास ? धर्मा तूं हा नवा जुगार आरंभला आहेस आणि हा शकुनीशीं खेळलेल्या जुगारापेक्षां अतिभयंकर आहे. तूं आपल्या या दुष्कर्मानें दुर्योधनास यशाच्या मार्गावर ठेवलें आहेस आणि आपण स्वतः खड्ड्यांत पडला आहेस. तूं मला आणि भीमार्जुनांना मोठ्या अडचणींत टांकलें आहेस. आमच्या एवढ्या दिवसांच्या कष्टांवर तूं क्षणाच्या जुगारासाठीं पाणी ओतलें आहेस. यश असें हातांशीं आलें असतांना शेवटच्या क्षणीं त्यावर जुगारासाठीं पाणी सोडणारा तुझ्यासारखा जुगारी कोण असेल बरें ? धर्मा मला निश्चयानें वाटतें कीं तुम्ही कुंतीचीं पोरें राज्य भोगण्यासाठीं जन्माला आलेलीं नाहींत, तर केवळ भीक मागण्यासाठींच विधात्यानें तुम्हाला उत्पन्न केलें आहे.'

युधिष्ठिर जुगारी याला याहून दुसरा कोणता दाखला हवा ? तो जुगारी नव्हता तर होता कोण—कौरव सभेंत तो द्यूत खेळला तो जुगार म्हणूनच. व्यसन म्हणूनच. राजधर्म म्हणून नव्हे. युधिष्ठिराच्या जुगारास पूर्वाधार म्हणून नळ राजाचें उदाहरण भारतांत दिसतें. पण त्यांतही धर्माला अप्रत्यक्ष टोलाच हाणलेला आहे. नळाचा प्रतिपक्षी पुष्कर हा नळ सर्व कांहीं हरल्यावर त्याला दमयंतीस पणावर लावण्याचें आव्हान देतो तेव्हां नळ जागा होऊन सोंगट्यांचा पट पुष्कराच्या कपाळावर हाणतो आणि दमयंतीसह निघून जातो. तो युधिष्ठिराप्रमाणें दमयन्तीस पणावर लावीत नाही. नळ द्यूत खेळला म्हणून युधिष्ठिराचा द्यूत धर्मसंमत बनणें बाजूलाच राहून, नळानें पत्नीस पणावर लावले नव्हते हा विरोधच अधिक ज्वलंतपणें युधिष्ठिराचा धिक्कार करावयास साधनीभूत होतो. कृष्णाचा शेवटचा निर्णय पाहिल्यावर धर्म हा जातिवंत जुगारी आहे हें पटावयास हरकत नसावी. रस्त्यावरच्या कोणत्याही जुगाऱ्यापेक्षा त्याला यात्रावर्तीत वेगळा मानावयास नको. उलट रस्त्यावरचे जुगारी आपली बायको पणास लावत नसतील तर तेच युधिष्ठिराहून अधिक श्रेष्ठ होत. उचपदस्थ व्यक्तींचें दुष्कृत्य हें तीव्रतर अधिक्षेपासच कारणीभूत व्हावयास नको काय ?

## मातुरुच्चार एव सः ९

## हा पुत्र नाहीं मलमूत्र आहे

युधिष्ठिराबद्दल द्रौपदी आणि कृष्ण काय म्हणतात तें आपण पाहिलें. परलोकाची पत्रास नसलेले इतरेजन तर पदोपदी धर्माचा धिक्कार करीतच होते. जिनें आविवाह साथ दिली ती पतिव्रता पत्नीही धिक्कार करूं लागली. राजद्वारी वा स्मशानीही बरोबर येणारा स्नेही कृष्ण तोही संतापला. आतां निदान मायमाऊली कुंती तरी या युधिष्ठिराला पोटाशीं धरणार आहे का ?

कुंती ही एका महान् कुलांत जन्म घेऊन हंसीनें एका सरोवरांतून दुसऱ्या सरोवरांत गमन करावे तशी कुरुकुलाची भाग्यशालिनी सून म्हणून हस्तिनापुरांत आलेली असते. ती तेजस्विनी आणि मानिनी असून अनेक प्रसंगांतून निघाल्यामुळें दूरदर्शी आणि बहुश्रुत झालेली असते.

तिला वाटत असते आपल्या पुत्रानें शत्रुरूपी सापाचे दांत तोडतां तोडतां भले मरणही कवटाळावें. श्येन पक्षाप्रमाणें गर्जना करत त्यानें यशाच्या आकाशांत भराऱ्या माराव्या. तिन्दुकाच्या लाकडाप्रमाणें एक मुहूर्तभर प्रखर ज्योतीनें प्रकाशित व्हावें पण गोवरीप्रमाणें उगाच धुमसत बसूं नये. बुडतांना अथवा उलथून पडतांना सुद्धां शत्रूची टांग पकडावयास त्यानें मागें पुढें पाहू नये. मग प्राण गेला तरी बेहत्तर.

त्यानें जळती आग होऊन शत्रूच्या मस्तकावर बसावें. क्रोध हा क्षत्रियाचा अवश्य गुण आहे. जो अमर्षशून्य असेल तो केवळ जंतू असून त्याला धड पुरुष म्हणणें कठीण; धड स्त्री म्हणणें कठीण. युद्ध करणें हाच राजाचा धर्म आहे. संध्याकाळच्या भोजनाची भ्रांत पडावी याहून अधिक घोर पाप कोणतें ? त्याहून मृत्यू अधिक श्रेयस्कर होय.

पित्याच्या लोळाप्रमाणें शत्रूंत घुसून पडणें हाच क्षत्रियाचा धर्म, असें मानणाऱ्या









कुंतीचा आत्मा विदुराच्या घरीं दानाच्या कण्या खात तळमळत होता. युधिष्ठिरानें बंधु कांता पुत्र यांसवें माऊलीवरही आपत्ती आणिली होती. सत्पात्रांवर ज्यामुळें संकटें येतात तो कथानकांतील खलपुरुष होय हा संकेत मान्य केला तर युधिष्ठिराशिवाय महाभारतांत दुसरा खलपुरुष शोधावयास नको. पण खलपुरुषासही कांही पुरुषत्व, व्यक्तित्व, खलता, कांहीतरी कणा असावाच लागतो. युधिष्ठिराला कणाच नसल्यामुळें त्याचें या खलपुरुषतेपासून सुदैवानें आपोआप रक्षण होतें. कुंती त्वेषानें तळमळत असतां हा सुपुत्र सर्वस्वी क्रोधशून्य होऊन अज्ञातवासांत केवळ नाममात्र पुरुषाप्रमाणें नपूसकाचें जीवन जगत होता. मान आणि प्रतिष्ठा यापासून वंचित होऊन आपल्या बंधुबांधवास आणि जिच्या उदरी जन्म घेतला त्या मातेस शोकांत टाकून तो शत्रूंना आनंद देत बसला होता.

डबकें कुडचाभर पाण्यानें भरावें, उंदिरास तांदुळाच्या दोन दाण्यांनी तृप्ती लाभावी तसा तो विराटाच्या दरबारांत मिळणाऱ्या जुगारी दानावर संतुष्ट होता. वज्रहत झालेल्या मुडद्याचें पौरुष आणि युधिष्ठिराचें पौरुष यांत कीचकाच्या प्रसंगीं कांहींच फरक दिसला नाहीं. हिजडे, कापालिक यांसारखे स्वाभिमानशून्य जीवन तो जगत होता. त्याचे आसन आणि वस्त्र निकृष्ट प्रतीचें होतें. कुणीही त्याचा अपमान करूं शकत होता. त्याच्या अचाट कर्मामुळें त्याचे बंधुबांधव सुखांतून निर्वासित होऊन स्थानभ्रष्ट आणि अकिंचन झाल्यामुळें जीवनास आंचवले होते. सबंध वंशाची प्रतिष्ठा धोक्यांत आलेली होती. संतोष, दया आणि उद्योगशून्यता यांनीं, त्यानें सर्व भाग्याचा नाश करत आणला होता. शत्रू मुक्तकंठानें त्याची निंदा आणि उपहास करीत होते. युधिष्ठिर कधीं युद्धांत जाईल आणि गेल्यास स्थिर राहील अशीं लक्षणें आतां दिसत नव्हतीं. तो व्यर्थच तें नांव धारण करीत होता. सम्राटपदावरून झालेल्या त्याच्या पतनाची भयानक परिसीमा झालेली होती. भीमार्जुनादि महावीरांची स्थिती दीनाहून दीन, दयनीय झाली होती. श्वानाप्रमाणें लांगूलचालन करीत युधिष्ठिर विराटापुढें तोंडपुजेपणा करीत होता. भरवशाचा बैल औताला जुंपतांच बसावा त्याप्रमाणें बंधुभावांनी त्याच्यावर सोपविलेल्या जबाबदारीची त्यानें धुळधाण उडविली होती.

नष्ट व्हावें पण शीर झुकवूं नये ही वीरवृत्ती त्याच्या जाणिवेंतही नव्हती. अज्ञातवासाची शर्थ पुरी केल्यावरही जेव्हां दुर्योधनानें त्याला राज्य नाकारलें तेव्हांही त्याचे पौरुष जागें झालेंच नाहीं. उलट त्यानें कृष्णाबरोबर निरोप पाठवून पांच गांवांची भीक मागितली. ही वार्ता कुंतीच्या कानावर गेली तेव्हां तिचा संताप झाला. आजपर्यंतच्या अनुभवावरून आतांतरी युधिष्ठिराचे डोळे उघडतील; आतांतरी त्याला आपल्या मातेची, भावाची, बायकोची आणि पुत्राची दया येईल; आतांतरी त्याची क्षात्रवृत्ती जागी होईल, आतांतरी सुदीन येतील अशा वाटणाऱ्या आशा नष्ट झाल्यासें तिला वाटलें. भीमाचें बळ, अर्जुनाचा पराक्रम हे फुकट गेल्यासारखें वाटलें. द्रौपदीचे शाप फळाला येणारच नाहींत असें वाटलें. पंडूचे नातू यापुढें कृष्णाच्या घरीं तुकडे मोडत बसणार, पंडूचे पुत्र वनांत राहणार आणि पंडूची सून भूमीवर लोळणार हें स्पष्ट दिसूं लागले.

आणि पुत्ररूपाने जणू आपण कलिपुरुषाला जन्म दिला अशा प्रकारचा विचार तिला शिवला. असला अमर्षशून्य, उत्साहशून्य, बल आणि पराक्रम विरहित कुपुत्र कुणाही सीमंतिनीच्या पोटीं कुणाही राजकुलांत जन्मूं नये असें तिला वाटलें. तिनें कृष्णाच्या तोंडीं युधिष्ठिराला सणसणीत निरोप दिला. विदुला आणि संजय यांच्या आख्यानाच्या रूपानें आपल्या मनांतील सारी धग प्रगट केली.

त्यावेळीं तिच्या बोलण्यांत आलें कीं असला पुत्र उदरांतून बाहेर निघाला हें तर खरेंच. पण उदरांतून फक्त पुत्रच बाहेर येतो असें नाहीं तर मलमूत्रही बाहेर येतें. केवळ उदरांतून आला म्हणून असला पुत्र हा मातेचा पुत्र ठरत नाहीं तर तो मातेचें मलमूत्र होय.

ज्या आपल्या चरित्रानें युधिष्ठिरानें कुंतीसारख्या स्त्रीच्या मनांत असे विचार आणले आणि मुखांत असे उद्गार आणले त्या चरित्राची अधिक महती ती काय वर्णावी! ●●









— जयवंत दळवी

# ' रम्य रम्य ' जें म्हणतात तें माझें बालपण......

जन्मस्थानाची ओढ कधीं कुणाला चुकलेली नाहीं. ज्या ठिकाणीं आपला जन्म झाला, जिथें आपला बाळपणींचा काळ सुखाचा गेला, जिथें कांहीं लोभ लावणारीं माणसें आपल्या निकट आलीं आणि आपल्या मनावर कायमचा ठसा ठेवून गेलीं ती माती भौगोलिकदृष्ट्या कितीहि भिकार असली तरी तिची ओढ सुटत नाहीं. म्हणूनच तर उतारवाटेला लागल्यानंतर ' रम्य तें बालपण देई देवा फिरूनि ' असा आक्रोश सुरू होतो.

तशांतहि, जें आपलें म्हणतां येईल तें गांव जो पोटासाठीं म्हणून सोडतो, जो शहरी जीवनाच्या महासागरांत एखाद्या थेंबासारखा पडतो आणि अस्तित्वाच्या दृष्टीनें विलीन होतो तो तर ' रम्य तें बालपण... ' हा आक्रोश विशेषच तिडकीनें करतो. कारण शहरांतल्या कडीकुलपांतल्या बंदिस्त जीवनांत तो कितीहि काल राहिला तरी सर्वार्थानें परकाच असतो.

अशावेळीं मला रहाटाची आठवण होते. रहाटाला अडकवलेली घागर विहिरींत सोडली म्हणजे रहाटाला एकदम गति मिळते. पाण्याच्या पृष्ठभागावर घागर आपटेपर्यंत रहाटाची गति वाढतच जाते; इतकी कीं, रहाटाच्या सर्व स्वतंत्र खुंट्या झटापट एकमेकांत विलीन होतात, लुप्त होतात. एक एक सुटी खुंटी दिसेनाशी होते. घागर फाटकन् पाण्यावर आपटली म्हणजे मग रहाटाची गति खुंटते. रहाटाच्या गिरक्या थांबतात आणि मग पुनः एकदां रहाटाच्या खुंट्या सुट्या दिसूं लागतात.

मन आणि स्मृति यांचेंहि कांहींसें असेंच आहे. जीवनाच्या धकाधकींत मन एकदां गुरफटलें, धुमश्चक्रींत रहाटासारखें गिरक्या खाऊं लागलें कीं वेगवेगळ्या स्मृति एकमेकांत विलीन होतात. एक एक आठवण ठळकपणें पुढें येत नाहीं. पण कुठें तरी, कधीं तरी आपली घागर आपटते. मन धकाधकींतून कांहीं क्षण बाहेर पडतें. कांहींसें स्थिरावतें आणि मग कांहीं स्मृति जाग्या होतात. ठळक होतात. त्यांतून कांहीं प्रसंग, कांहीं व्यक्ति चालत्या बोलत्या होतांना दिसतात......

नाहीं म्हणायला पदरचे पैसे मोडायची पाळी आली म्हणजे आपल्या भिकार गांवाच्या औदार्याची राहून राहून आठवण येते. एका रत्तलांत येणाऱ्या आठ–दहा कैऱ्यांसाठीं किंवा नारळाएवढ्या फणसाच्या कुवऱ्यासाठीं मुंबईच्या बाजारांत भाजीवाल्यानें आठ–दहा आणे मागितले कीं मरूं घातलेल्या पांखरासारखा जीव तडफडतो. फुकट मरायला या शहरांत आलों असें वाटून पश्चाताप होतो. इन्कम-टॅक्स भरतांना पैसे कमावल्याचा जसा तात्पुरता पश्चाताप होतो तसा. लहानपणीं गांवांत असतांना कैरी खाण्याची इच्छा झाली तर कैरीचा





अनुक्रमणिका

आजपर्यंत अनेक सुप्रसिद्ध आणि नामवंत लेखकवर्यांनीं लिहिलेलीं सरस व दर्जेदार शब्दचित्रें दीपावलींतून अनेकवेळां वाचकांनीं वाचलीं आणि तीं अत्यंत लोकप्रियही झालीं—

या अंकापासून महाराष्ट्राचे नव्या दमाचे विनोदी लेखक श्री. **जयवंत दळवी** यांच्या मिष्कील लेखणींतून उतरलेलीं ही अविस्मरणीय ‘पात्रें’ ही वाचकांना तितकींच आवडतील यांत शंका नाहीं—

भाव काय असें कुणालाहि विचारण्याचें कारण पडत नसे. ज्या क्षणीं इच्छा होईल त्या क्षणीं खालीं वांकावें. जमिनीवरची नळकुटी उचलावी आणि सुऽऽई आवाज करीत ती भिरकावून द्यावी. पानांची सळसळ करीत चार कैऱ्या टपाटप खालीं पडत. कैऱ्याबरोबर मीठ हवेसें वाटलें तर पुनः घरीं जायला नको. बाजारांत भुसारी दुकानाच्या समोर रस्त्याच्या कडेला भरून ठेवलेल्या टोपल्यांत जातां जातां अलगद हात टाकावा. काळें ठिक्कर मीठ. चिमूटभर किंवा मूठभर घ्यावें आणि कैऱ्या करकरां चावून खाव्या. आठवण होतांच तोंडाला पाणी सुटतें.

असें भर रस्त्यांत मीठ लुटतांच ‘ हात् भोसडीच्या ’ अशी एक शिवी फटकन् दुकानांतून सुटायची. पण तेवढीच. त्यापलिकडे कार-वाई नाहीं. मीठ खातांना शिवीहि खायची एवढेंच! पण शिवी त्यानें दिली म्हणून खाल्लीच पाहिजे असें थोडेंच आहे ? शिव्या तर पदोपदीं मिळायच्या. अजीर्ण होण्याइतक्या ! खाऊन तरी खायच्या किती ? त्यावेळीं लोक तेवढेसे शिकलेले नव्हते. त्यामुळें शिव्या नसलेली भाषा गांवकऱ्यांना माहीत नव्हती. कुठेंहि जा, आधीं शिवी बाहेर पडायची. भुसारी दुकानांत मोठें दुकान नायकाचें. गल्ल्या-जवळ उघडाबंब नाईक पोटाच्या वळकट्या सांभाळीत बसलेला असायचा. दुकानावर गिऱ्हाइकांची सावली पडली कीं तिरक्या मानेनें चष्म्याच्या वरून बघायचा आणि गुळाची ढेप फोडायच्या सुरीनें घामानें थबथबलेली पाठ खरवडीत खेंकसायचा ‘ नऱ्या, भडव्या ध्यान खंय ? त्या मेल्याक काय व्हयां बघ–’ त्या शिवीमुळें डुलकी घेणारा नरू जागा व्हायचा. ‘ पैशाची साखार दी रे–’ असें म्हणून कुळवाडी लंगटीच्या टोकाला बांधलेला ढब्बू पैसा द्यायचा. तोहि ढब्बू पैसा नाईक बंद्या रुपयासारखा खणकन् वाजवून पहायचा आणि एक पैसा परत करायचा. हा राजा छाप ढब्बू पैसा आतां गेला तो गेलाच. लहानपणीं बाजारांत जायचें असो किंवा देवळांत भरणाऱ्या जत्रेला जायचें असो. पै, पैसा आणि ढब्बू पैसा यापलिकडे आमचा व्यवहार कधीं गेला नाहीं. आतां नोटा मिळवायच्या आणि पै-पैसा जवळ केल्याचें सुख मिळवायचें.

असें त्यावेळचें आमचें गांव !

भौगोलिकदृष्ट्या म्हणाल तर या गांवाचा नकाशा मला अजूनहि काढून दाख-विता येणार नाहीं. शाळेत असतांना भूगोलाच्या तासाला आम्ही रत्नागिरी जिल्हा, मुंबई इलाखा आणि हिंदुस्तान अशा भूप्रदे-शांचे एकापेक्षां एक मोठे नकाशे तरबेज हातानें काढीत असूं. पण यापैकीं कोणत्याहि नकाशांत आमच्या गांवाचें नांव टाकण्याची हिंमत आम्हाला कधी झाली नव्हती. हें गांव त्रिकोणी आहे कीं चौकोनी आहे कुणास ठाऊक ! एक तलाठी सोडला तर गांवांतला कुठलाहि इसम तें सांगू शकणार नाहीं. इतकेंच काय आमच्या गांवाची हद्द इतर किती गांवांना कुठें भिडली हें सुद्धां सांगणे कठीण. फक्त एवढेंच सांगतां येईल कीं, उशीकडे डोंगरपायाकडे समुद्र आणि अंगा खालीं लाल मुरमाड माती.

या मातींत आतां गांवचीं पोरें फुटबॉल आणि क्रिकेट खेळूं लागलीं आहेत. पूर्वी आम्ही विटी-दांडू, हुतुतू आणि आट्यापाट्या खेळत असूं. दुसरा धमालीचा खेळ म्हणजे आबाधुबीचा. चिंध्या भरून केलेला चेंडू फेकून दुसऱ्याची पाठ शेकून काढायची आणि तिसरा लगोऱ्याचा खेळ. याच चिंधीच्या चेंडूनें करवंट्यांचा मनोरा फोडायचा. आतां मुंबईच्या दीड खणी घरांत पाणी तापवण्यासाठीं बंबाच्या शेजारीं करवंट्यांची चळत दिसली कीं लगोऱ्याच्या खेळाची आठवण होऊन जीव हुरहुरल्यासारखा होतो.

अशा या तांबड्या मातींत निश्चित पिकलें असें म्हणण्यासारखें कांहीं पिकतच नसे. पण तरीहि कांहींतरी पिकवण्यासाठीं सर्वांगानें उघडा आणि सडसडीत असलेला कुळवाडी दिवसभर शेतांत खपत असे. अर्थात, खपत असे म्हणजे काय करीत असे कोण जाणें ! या रुक्ष मातींत गुरें चरत असत तसाच कुळवाडीं खपत असे. चरण्याच्या निमित्तानें गुरें मातीला तोंड लावीत फिरत असत. पण तीं काय खातात याचा कधीं कुणी विचार केला नाहीं. तसाच कुळवाडी शेतात खपायचा म्हणजे काय करायचा याचा सुद्धां कुणाला पत्ता नसायचा. आतां आठवण झाली कीं चित्र डोळ्यांसमोर उभें रहातें. डोकीवर किंवा खांद्यावर हातमागाची फाटकी घोंगडी. तिच्याबद्दल उल्लेख निघाला कीं, ‘ वशाड पडो. धड दहा वर्षां सुद्धां टिकली नाय– !” अशी तक्रार. वीतभर लांबीरुंदीची मळकट लंगोटी कमरेला त्यांतल्यात्यांत कुळवाडी थोडा सधन असला तर लंगोटी अडकवण्या-साठीं सुतळीऐवजी चांदीचा गोट. त्यावर लांकडी आंकडा. त्यांत अडकवलेला कोयता डोक्यावर पेंडी किंवा भारा घेऊन तो चालूं लागला कीं कोयता पटाक् पटाक् मांडीवर आपटायचा. हा कोयता मारला आणि एका घावांत कांहीं तुटलें असें कधीं होत नसे.

नांगराला आपलें किंवा तें भुकेपोटीं मेलें असलें तर दुसऱ्याचें जनावर जुंपायचा



“ हात ×××× ”
कोकणांतील दुकानदार टोपलींतील मीठ पोरांनीं घेतलें कीं एक पेटंट शिवी हांसडतो म्हणतो पण लगेच गप्प राहतो.






गाय, बैल, म्हैस किंवा रेडा. मिळेल तशा जनावराची जोडी नांगराला जुंपायचा. कधीं गाय आणि रेडा; कधीं बैल आणि म्हैस. पण शक्यतों गाईवर मेहरनजर असायची. हातांत चिंचेचा फोक. नांगराचा फाळ जमिनींत रुतवून तो बैलांना फोडून काढायचा. बैलांच्या बरगड्यांवर चांगले वळ उठलेले दिसायचे. 'चॅक्–चॅक्–चॅक्–चॅक् छक्क भाड्या–मेले खावच्या कामाचेऽऽ–" असा तो वैतागून बैलांवर खेंकसायचा. खायच्या कामाचे असें त्यानें बैलांना म्हटलें तरी त्यानें त्यांना कधीं खायला घातलेलें नसायचें. मरायला टेकलेले बैलहि त्याच गांवचे. त्यांना कसलीच फिकीर नसायची. सप्तपदी करणाऱ्या नवरदेवासारखे ते पाय उचलायचे. आठवें पाऊल घ्यायचें नाहीं अशा बेतानें. मध्येंच एक बैल अडायचा. म्हणून दुसरा थांबायचा. जोत थांबलें म्हणून कुळवाडीहि थांबायचा. 'शिरां बसलां मेल्यांच्या तोंडार...वाघ खाव येवन या मढ्यांक...' असें पुटपुटत तोहि शेताच्या मेरेवर येऊन बसायचा आणि राख झाडून चिलमींत न जळलेला तंबाखू किती आहे त्याचा शोध घ्यायचा. अशा ठेक्यानें आणि गतीनें टांगभर लांबीरुंदीचा तुकडा नांगरण्याचें काम चालूं असायचें.



शिमग्याच्या वेळीं पोरें 'शबय शबय' करीत गांवभर हिंडायची.

मग पावसाळा यायचा. पाऊस पडला म्हणजे घसघशीत. नाहीं म्हणजे कांहीं नाहीं. चार इंच पाऊस पडला, आठ इंच पाऊस पडला ही इंचांची भाषा आम्ही शहरांत आल्यावर शिकलों. ढोपरभर पाणी झालें, कंबरभर पाणी झालें, छातीवर पाणी गेलें अशी ठोक भाषा आमच्या तोंडीं असायची. ठिकेठिकाणीं डबकीं, हांडके भरलेले असायचे. त्यांत दोन दोन हात लांबीचीं हिरवी गार हिवाळीं रेघ लावून पाण्यांतून सरकत असायचीं. त्यांना चुकवत बेडक्या पटापट उड्या मारायच्या. हिवाळ्यानें एखाद्या बेडकीचा पाय पकडला कीं मग तिचें अत्यंत करुण आवाजांतलें रुदन चालूं व्हायचें. बेडकीच्या पायांतून ओघळणाऱ्या लालभडक रक्ताचा बोटभर थर पाण्याच्या पृष्ठभागावर दिसायचा एक दगड मारला, कीं सुळकांडी मारून हिवाळें पाण्यांत गडप व्हायचें आणि जखमी बेडकी टुणकन उडी मारून चिखलांत आडवी पडायची. अशा कितीतरी बेडक्यांना त्यावेळीं आम्ही जीवदान दिलें होतें. आणि स्वर्गांत जमा झालेल्या पुण्याचा भाविकपणें हिशोब केला होता.

दोन चार दिवस सुके गेले, डबक्यांतलें पाणी आटूं लागलें कीं रात्रींच्या वेळीं मोठ्या मोठ्या बेडकांचें 'डरांव डरांव' असें सामुदायिक संगीत सुरू होई. मग कुळवाड्यांच्या जीवांत जीव येई. 'आयलो–आयलो' असें म्हणत ते पावसाची वाट पहात. आणि मग पुनः एकदां सरींच्या वर्षावांत सारें गांव गुडुप होऊन जाई. त्या काळांत तरवा, लावणी, मोडणी होऊन जाई. मग दसरा उजाडतांच हिवाळीं बाहेर पडत. वांवभर लांबीचे आणि मनगटाएवढ्या रुंदीचे दिवड, घणस आमच्या पायामधून झपाझप पळ काढीत. त्यानीं पळ काढला कीं संपलें. पाऊस गेला.

मग बामण लोक जागे व्हायचेत. पंचाची कनवट आवळून चौकशा करायचेत, 'इश्रामा, आंदा पीक–पाणी कसा काय ?'

'शिरां बसलां शेतार. कसलां इलां पीकपाणी! गुदस्ताच्या मानान् काय नाय !'

गेलें तें वर्ष बरें होतें अशी रडारड सुरू व्हायची.

'पीक म्हणश्यात तर चार आणे सुद्धां नाय—' अशी आण्यांची भाषा सुरू व्हायची. पण त्या भाषेला कांहीं ठांशीव अर्थ मात्र नसायचा. एका गुंठ्यांत रुपयाचें पीक म्हणजे किती पायल्या, किती कुडव हें कुणाला माहीत नसायचें. चार आणे पीक आलें म्हणजे निश्चित किती आलें याचाहि पत्ता नसायचा. आलेल्या भातांतून थोडें भात बामणाला द्यायचें बाकी सारी थकबाकीं उरलेलें दोन चार महिने आपण खायचें. बाकीचे महिने उपासमारीनें काढायचे.

बाकी उरलेल्या महिन्यांत पोफळींचें बेडे, पानवेलीवरलीं पानें किंवा केळीचें केळफूल विकून कशीबशीं गुजराण करायची. घराच्या आवारांत केळ मात्र हमखास दिसायची. मासळी नीट करायची त्याच केळीच्या मुळांत. आंघोळहि तिथेंच. त्या पाण्यांत पोसलेल्या केळीला घड लागला कीं घरीं सर्वांना देवाची आठवण व्हायची. चुन्याची पुटें चढविलेला घड हात न लावतां छपराला टांगलेला असायचा. घड पिकून पिवळा धमक झाला कीं डोक्याला त्यांतल्या त्यांत सफेत मुंडासे बांधून घड खांद्यावर घेऊन कुळवाडी देवळाचा रस्ता धरायचा. मग रस्त्यावरचीं पांच पंचवीस पोरें घडामागोमाग देवळाकडे जमत. देवापुढें घड ठेवला आणि त्यावर पाणी सोडलें कीं 'जय देवा म्हाराजा...' अशी, खणखणीत आरोळी ठोकून. गुरव गाऱ्हाणें घाली,



'सोन्या भडव्या, गेल्या वर्सा तूं बरोबर तर्र झालय नाय्, या वर्सा तसां नको'

मग तीर्थ घेऊन कुळवाडी श्रद्धेनें देवापुढें नाक घासी. अर्धा घड पोरांना वाटण्यांत जाई. प्रसाद म्हणून केळ्यांचे दोनचार फणे कुळवाड्याच्या घोंगडींत पडत. तीं केळीं घेऊन कुळवाडी आपल्या घराचा रस्ता धरी. घोंगडींतले दोन फणे बामणाच्या सोप्यावर ठेवी आणि बाकीचे फणे घरीं नेई.

अशी त्यावेळीं देवावर आणि धन्यावर श्रद्धा होती. देवळांतली रवळनाथाची मूर्ति फणसाच्या लांकडाची. त्यामुळें गांवांत कुणी फणसाच्या लांकडाच्या पाटावर किंवा खुर्चीवर बसत नसे. दांतांवर मारायला पैसा नसलेला सुतार रिकामा बसला असता. पण त्यानें मजुरीच्या आशेनें कुणाला फणसाच्या लांकडाचा पाट करून दिला नसता. मोडून पडलेलें फणसाचें झाड सुकून सडून नाहीसें व्हायचें. पण त्याच्या काटक्या कोणी चुकून सुद्धां चुलींत सारीत नसत.

अशी विलक्षण श्रद्धा त्या देवावर होती. दिवसांतून एकदां तरी देवळांत बसून जायचें. जातांना घंटेचा घोष देऊन 'देवा तूं पाव !'


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



असें म्हणून घरचा रस्ता धरायचा. कुठलेंहि पाऊल पुढें टाकण्या-आधीं देवाचा कौल घ्यायचा. मग ती गोष्ट पोरीच्या लग्नाची असो किंवा घराचे वासे बदलण्याची असो. देवाचा कौल घेतल्याशिवाय पान हालत नसे.

शिकार आणि शिमगा हे देवळाच्या आवारांतले दोन धामधुमीचे प्रसंग. देवाला वर्षांतून एकदां हिंस्र पशूचा नैवेद्य दाखवावा लागत असे. त्यासाठीं शेंदीडशें गांवकरी वर्षांतून एकदां शिकारीला निघायचे. त्यांत अनेक बामणहि सामील असायचे. सारा खर्च देवस्थानाकडून व्हायचा. दहा पंधरा मैल रपेट करून कुठल्या तरी जंगलांत हे लोक भयभीत होऊन शिरायचे. एकमेकांचे हात धरून झुंडीनें रान तुडवायचे. कुठून सशानें उडी मारली तरी वाघ आला अशा भीतीनें ओरडायचे. दीड–दोनशें लोकांत आठ–दहा बंदुका असायच्या. त्यांतल्या दोन–चार छरे मारायच्या बंदुका असायच्या. गांवांत वानरांचा सुळसुळाट झाला कीं आवाज काढून त्यांना पळविण्यापुरत्या त्या बंदुका. छरे नसले म्हणजे काळे वाटाणे सुद्धां चालत असत. तरी लोकांनीं शिकारी म्हणावें म्हणून त्याहि बंदुका बार काढण्यासाठीं खांद्यावर घेऊन लोक ऐटीनें शिकारीवर निघत. नाहीं म्हणायला काडतुसें भरायच्या दोन बंदुका असत. त्यांतली एक गांवतल्या फौजदाराची. समुद्रावरचीं बकीं मारायचीं असलीं म्हणजे ती बंदुक बाहेर येई. मला आठवतें, 'आपू, बक्यांची सागोती खातलय ?' असें विचारून ते मला घेऊन समुद्रावर जात. किनाऱ्यावर शेंपन्नास बक्यांचा थवा पांढरे शुभ्र पंख फडफडवीत बसलेला असे. मी बोललों तर बकीं उडून जातील या भीतीनें ते माझ्या तोंडावर हात ठेवीत आणि मांजराच्या पावलानीं कसला तरी आडोसा घेत. खांद्याला बंदुकीचा दस्तां लावीत आणि नेम धरण्याच्या निमित्तानें पांच–दहा मिनिटें काढीत. 'छा ! मेलीं धड गप्प बसणत नाय ! माशासारखीं हलतत !' असें म्हणतां म्हणतां आणि नेम धरतां धरतां चुकून चापाला बोट लागायचें आणि बार सुटायचा. परीट घडीचें धोतर उडावें तसा तो पांखरांचा थवा आवाजाने उडून जाई. मग मेलेले पाखरूं उचलण्यासाठीं आम्ही घाईघाईने थवा बसला होता त्या जागीं जाऊन शोध करीत असूं. पण एकहि पाखरूं मेलें नाहीं या विचाराने फौजदार खजिल होत. मग माझ्या पुढ्यांत आपली बेअब्रू नको म्हणून म्हणत असत, 'ऐकलंय आपू, दोन चार तरी बकीं जखमी झालीसत. उडून गेलीं तरी खंय ना खंय मरून पडतलीं !'

असे हे फौजदार सुद्धां शिकाऱ्याचा खाकी पोषाख चढवून शिकारीच्या जथ्यांत सामील होत. लाख्याकांड्या आपटत, आरडा-ओरडा करीत सारे लोक रान उठवीत. मग कुठून तरी आठ–दहा रानडुकरांचा कळप दौडूं लागे. आणि मग डुकर आपल्या अंगावर येतील या भीतीनें बंदुका रोखल्या जात. बिगर बंदुकवाले लोक मागें पळत 'बेगीन बार काढा–बेगीन बार काढा' असें ओरडत आणि मग जिवाच्या आकान्तानें चाप ओढून ढमा ढमा बार काढले जात. त्यांतला एखादा डुक्कर आडवा होई. त्याच्यावर पुनः दोन गोळ्या मारून तो मेलेलाच आहे याची खात्री करून घेतली जाई. मग वाजत गाजत मिरवणुकीनें तो डुक्कर देवळांत आणला जाई. त्याचा देवाला नैवेद्य दाखवला जाई आणि [illegible] गांवाला थोडें थोडें मांस [illegible] जाई.

तथापि डुक्कर कोणाच्या गोळीनें मेला याची चर्चा होऊन पुढें भांडणें मारामारीपर्यंत पाळी येई. पहिली गोळी कुणाची बसली हें कुणी सिद्ध करूं शकत नसे. तरी पण पहिली गोळी माझीच असें प्रत्येक बंदुकवाला म्हणायचा आणि भांडणें व्हायचीत, तीं थेट शिमग्यापर्यंत.

शिमगा म्हणजे गांवांतला मोठ्या धमालीचा सण. बावटे घेऊन गांवांत रोंबटें नाचायचीं. काठीला टाळे बांधून पंधरा दिवस पोरें 'शबय–शबय' करीत गांवभर घरोघर फिरायची. वाघाचे पट्टे अंगावर ओढलेला वाघ, छत्रीचें जुनें कापड तोंडावर घेऊन आलेला कोल्हा किंवा जुनी घोंगडी पांघरून पाय ओढत आलेलें अस्वल–अशीं अनेक सोंगें घेऊन पोरें आमच्या घरी येत असत. प्रत्येक पोराला एक पै अशा हिशोबानें पंधरा दिवस दानसत्र चालूं असायचें. त्यामुळें कांहीं वस्ताद पोरें राधा–कृष्णाचा नाच आणीत. कृष्ण, राधा, पेंद्या आणि किमान नऊ सवंगडी असा तब्बल बारा पोरांचा मेळा येई. हेतु हा कीं एका झपाट्यांत बारा पै म्हणजे एक आणा मिळावा.

माझे आजोबा बाबुराव, पै न देतां पैसा दोन पैसे द्यायचे असें त्यांच्या काळांत सोंगें घेऊन जाणारे लोक सांगत. पण त्यावेळची परिस्थितीहि निराळी होती. त्यांना मी कधीं पाहिलें नव्हतें. पण त्यांच्याबद्दलच्या अनेक आख्यायिका कित्येक दिवस ऐकत होतों. त्यावरून मी त्यांच्या रूपाची आणि अंगाबांध्याची कल्पना बांधली होती. ते करारी चेहऱ्याचे, भरदार अंगबांध्याचे आणि पुरेशा उंचीचे असावेत. त्यांच्याकडे त्यावेळीं पैसाहि मुबलक होता. नोटा मोडून त्यांचे खणखणीत बंदे रुपये करून ठेवण्याचा त्यांना नाद. नोटांवर त्यांचा विश्वास नव्हता. कधीं ना कधीं या कागदी नोटांच्या कपट्यांचा केरकचरा होणार अशी भीति त्यांच्या मनांत ठाण मांडून असे. रुपयांच्या पिशव्या भरून ते माडीवर ठेवीत आणि चुकून



## परमेश्वराची लीला अगाध आहे !

'ईश्वराच्या दयाळूपणावर माझा पूर्ण विश्वास आहे. तुम्ही एक द्या, तो दयाघन तुम्हाला दोन दिल्याशिवाय रहात नाहीं.' गोविंदराव आपल्या मित्राला सांगत होते.

'अस्सं––पण तें कसं काय ?' मित्रानें विचारलं.

'अरे दोस्त' गोविंदराव म्हणाले, 'एके दिवशीं सायंकाळीं मी एका गिऱ्हाइकास एक खोटा रुपया दिला आणि खूष झालों. पण दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्या दयाघनानें एका तरुणीच्या रूपानें येऊन मला चक्क दोन खोटे रुपये दिले......मागें मी माझ्या मुलीचं लग्न केलं. माझ्या घरांतून एक जेवणारं तोंड कमी झालं, म्हणून मी खुषींत होतों; पण तो दयाघन स्वस्थ नव्हता; दोन महिन्याच्या आंत माझी मुलगी व जांवई या दोघांनीं माझ्या घरीं येऊन मुक्काम ठोकला. परमेश्वराची लीला ही अशी आहे !




पिशव्यांचा आवाज झाला तर ' लोखंडी खिळे आणून ठेवतंय, घराचां छप्पर बदलूंक होया.' असें सारखें सांगत सुटत.

पण शिमगा आला म्हणजे मात्र दोन पिशव्या आपखुषीनें ते मोकळ्या करीत. विशेषतः होळीच्या दिवशीं सारी धामधूमच असायची. अजूनहि थोडी फार असतेच. ज्याच्या परसांत पोफळीचें झाड सर्वांत उंच असेल ते बिनदिक्कत तोडलें जातें. तें देवासाठीं असल्यामुळें कुणाचा विरोध चालत नाहीं. तोडलेली पोफळ देवळाच्या आवारांत टाकायची आणि तडक आमच्या घरीं यायचें ही कुळवाड्यांची वहिवाट. आतां प्रमाण बरेंच कमी झालें आहे. माझ्या लहानपणीं सुद्धां हें प्रमाण घटत होतें. पण आजोबांच्या काळांत खरा रंग होता. पावल्या–अधेल्या या नाण्यांनीं भरलेल्या दोन पिशव्या घेऊन आजोबा ओटयावर बसलेले असत. कुळवाड्यांची दुपारपासून घरीं रीघ लागे. एकेक जण हात पसरून उभा राही. मग आजोबा पिशवींतून प्रत्येकाला आठबारा आणे द्यायचे. हें दान फक्त दारू पिण्यासाठीं असायचें. ' सोन्या, भडव्या गेल्या वर्सा तूं बरोबर तर झालय नाय. या वर्सा तसां नको...' अशी ताकीद देऊन ते त्याला आणखी एक पावली देत आणि म्हणत ' काजीचो सोरो पी, नाय तर माडी घेऊन फुकटचां पोट फुगैशीत !'

मग गांवांतल्या निरनिराळ्या गुत्त्यांत जत्राच भरत असे. संध्याकाळीं चक्क सात–आठशें लोक लालबुंद, तारवटलेल्या डोळ्यांनीं एकमेकांकडे पहात देवळाच्या आवारांत जमत. पचापचा थुंकत. चुरमुरे, चणे खात. एकमेकांना शिव्या देत, मिठ्या मारीत आणि देवळासमोर पानपत करून टाकीत. कुळवाड्याच्या बायका आणि पोरें होळी बघायला जमत. हजार–दीड हजार लोकांचा जमाव. होळीचा प्रचंड जाळ भगभगूं लागे. काळोख पडण्याच्या सुमारास आजोबा येत. रेशमी फेटा, लांब कोट, धोतराचा कासोटा, गळ्याभोंवतीं उपरणें. एरव्ही ते हातांत काठी घेत, पण या दिवशीं मात्र काठीशिवाय येत. हेतु हा कीं कोणी दारूच्या नशेंत गैर वागला आणि त्याचा त्यांना राग आला तर त्याच्या टाळक्यांत काठी बसायला नको.

पंधरा–वीस महार ढमाढमा ढोल बडवीत खुशाल जमावांत घुसत. त्या एका दिवशी अस्पृश्यता विसरली जाई. तासेवाले मुसलमान, सनईवाले देवळी, सारे एकमेकांत मिसळून आणि जगाला विसरून आवाजावर आवाज चढवीत. पोफळीचा शेंडा तोडून त्याला भगवा झेंडा बांधण्यांत येई. त्या झाडाची आजोबा पूजा करीत. मग ' हर हर महादेव ' अशी एकच गर्जना होई. पोफळ सरळ उभी करून ती तालांत नाचवली जाई. गुरव लोक पोतीं भरून गुलाल उधळीत. अवघें आकाश लालबुंद दिसे. दारूच्या वासांत बरबटलेलीं शेंकडों तोंडें अचकट विचकट घोषणा देत. तोंडांवर उलटीं मनगटें मारून बोंबाबोंब करीत.

कितीतरी वेळ असा प्रकार चालायचा. थकव्याचे नांव नसे. डोकीचे शेमले उडवीत, ताटांतला गुलाल दुसऱ्याच्या तोंडांना फाशीत, गुलाल आजोबावर उधळीत, मध्यरात्रीपर्यंत नुसती धमाल चालू असे. शेवटीं आगीच्या शेजारी पोफळ पुरून ठेवली कीं होळी संपली.

ताबडतोब धर्मशाळेंत जेवण तयार असायचें. पुरुष पुरुष उंचीचे हंडे चुलीवर चढलेले असायचे. त्यांत बकऱ्याचें मटण, पाटी भरून वडे. पहाटेपर्यंत आजोबा आपल्या हातानें प्रत्येकाच्या हातीं जेवणाची पत्रावळ देत.

आजोबांची आठवण झाली कीं ही एक आठवण त्यावेळचे म्हातारे अगदीं तपशीलासह हमखास सांगत. आणि ते दिवस फिरून येणार नाहींत असें म्हणून चुटपुटूं लागत. आमच्या घरीं म्हातारी भटीण होती, ती तर दर शिमग्याला म्हणायची, ' कसला रे आतां शिमगा ? बाबुराव शिमगा घेऊन गेले ! ' तें खरें असावें !

या भटणीला बाबुरावांनीं आश्रय दिला होता. ती जातीनें ब्राह्मण होती. माथ्यावरल्या पदराची होती. घरांतलें शिवराक जेवण ती करायची. ती कुठल्या गांवची तें आम्हांला माहीत नव्हतें. सोळाव्या वर्षी तिचा नवरा गेला आणि डोकीवरच्या पदराची झाली. नंतर कुठेंतरी पाय घसरला तिचा. तिला दिवस गेले म्हणून घरच्या लोकांनीं तिला घराबाहेर काढलें. रानांत कुठें तरी जीव द्यायला ती जायला आणि तियेंच बाबुराव गांवकऱ्यांसह शिकारीला जायला एक गांठ पडली. बाबुरावांनीं तिला जीवदान दिलें. तिला घरीं घेऊन आले. चोरून मारून नव्हे तर जाहीरपणें त्यांनीं तिचें बाळंतपण केलें. पुढें तें मूल मेलें. कालान्तरानें बाबुरावहि गेले. भटीण मात्र आमच्या घरीं घरच्या माणसासारखी राहिली. घरांतल्या प्रत्येक माणसावर, चीजवस्तूंवर जीव ठेवून राहिली. शंभरीच्या जवळ आल्यावर ती भ्रमिष्ट झाली. त्यांतच तिला वेड लागलें. नेसतें वस्त्र सोडून फिरूं लागली. अंगावर वस्त्र टिकूं देईना म्हणून तिला मोठ्या नाइलाजानें काळोख्या खोलींत कोंडून ठेवण्याचा कटु प्रसंग ओढवला. तेव्हां तर आमच्या घरीं सर्वांच्या डोळ्यांत टिपें आलीं.

वेड लागून तिचें मन स्वैर झालें तरीसुद्धां ती फक्त एकट्या बाबुरावांचाच जप करायची. कांहींहि अद्वातद्वा बोलायची. स्वगत गोष्टी करायची. पण सारें कांहीं बाबुरावासंबंधीं अगदीं शुद्ध भटी भाषेंत बोलायची. जेवण देण्यासाठीं बंद खोलीचें दार वाजवून ' भटणी गेऽऽ! ' अशी हांक मारली कीं ती ताबडतोब उठायची आणि म्हणायची, ' अग्गो बाये, बाबुराव आले. पाण्याचा तांब्या देते पाय धुवायला ! ' त्या वेडाच्या भरांतच तिचें पुढें निधन झालें, तेव्हां तर आम्हा सर्वांना आमचें घर उघडें उघडें वाटूं लागलें.

भटीण गेली आणि दोनच दिवसांत रामेश्वराच्या देवळासमोरच्या तलावात वासुदेव भटजी बुडून मेले. रामेश्वराचें देऊळ हें गांवांतलें एक दुसरें छोटें देऊळ. वस्तीपासून कांहींसें दूर. टेकडीकडे जाणाऱ्या रस्त्यावर. रस्त्याच्या एका बाजूला देऊळ आणि दुसऱ्या बाजूला कुणा जुन्या ग्रामपुरुषाची समाधि. या समाधीच्या एक खणी जागेंत वासुदेव भटजी रहायचे. समाधीच्या दोन खिडक्या कोळीष्टकांनीं माखलेल्या होत्या. खिडक्यांना दारें नव्हतीं, तरीसुद्धां पडद्यासारखीं गजांवर जळमटें पसरलेलीं होतीं. भटजीनीं त्यावर जन्मांत कधीं झाडू फिरवली नव्हती. किती वर्षे ते तेथें भुतासारखे एकटे रहात होते. त्याचा कुणाला पत्ता नव्हता. टेकडीवर स्मशान होतें. त्यामुळें रात्रीं







अनुक्रमणिका

अपरात्रीं त्या रस्त्यानें प्रेतें जात, आणि तरीहि ते तिथें एकटे रहात याचें त्यावेळीं आम्हाला मोठें कौतुक वाटे.

रामेश्वराची पूजा करणें, देवाला नैवेद्य दाखवून त्यांतलाच वाटीभर भात जेवणें आणि बाकीचा आख्खा दिवस रामेश्वराच्या लिंगाशेजारीं जप करीत बसणें एवढा त्यांचा नित्याचा उद्योग होता. झोपायला समाधींत यायचें. समाधीसमोरच्या पिंपळाखालीं दोन गाई बांधलेल्या असायच्या. त्या गाईंवर त्यांचा सारा जीव. गाईंच्या पुढ्यांत दोन पेंढ्या सोडून ते समाधीच्या बाजूला झोपायचे. जाग आली म्हणजे ' गोदे, गो कृष्णे...' अशा गाईंना हांका मारायचे.

ते दर द्वादशीला आमच्या घरीं यायचे. खडावांचा खाड्खाड् आवाज करीत यायचे. ते आले आणि ओट्यावर बसले म्हणजे आम्ही पावशेर तांदुळ आणि नारळ असलेलें सूप त्यांच्या पुढ्यांत ठेवीत असूं. भटीण त्यांना दोन केळीं द्यायची. आणि म्हणायची, ' इथंच खावा. नाहींतर गाईंच्या पोटांत पडतील–' मग कांहीं न बोलतां भटजी बुकुबुकू केळी खात आणि शालीच्या झोळींत सालें ठेवीत. गायीसाठीं पडशींत नारळ आणि तांदुळ टाकून न बोलतां इकडे तिकडे न पहातां तडक चालूं लागत.

छातीपर्यन्त लोंबणारी पांढरी शुभ्र दाढी. पाठीवर सोडलेल्या पिवळट रंगाच्या जटा. कमरेला पंचा. खांद्यावर लाल भडक रंगाची लोकरी शाल. कमरेंतून वांकलेली ती जीर्ण कृश यष्टी आम्ही कित्येक वर्षें जशीच्या तशी पहात होतों. ' कसां काय, भटजीबुवा ?' एवढा प्रश्न कधीं कुणी विचारला तर ' ठीक ' एवढें एक तुटकें उत्तर देण्यासाठीं त्यांचे ओठ दाढीमिशांतून हालत असत. बाकी ते कधीं कुणाशीं तोंड अथवा मन उघडून बोलल्याचें आम्ही कधीं पाहिलें नव्हतें. दिवसा किंवा रात्रीं समाधीवरून टेकडीवर प्रेत गेलें तर ' कोण रे !' एवढी मामुली चौकशी सुद्धां ते कधीं करीत नसत.

घरीं मी किंवा इतर कुणी मुलें आजारी असली, कीं ' भटाकडून विभूति अणत्यें–' असें सांगून भटीण वासुदेव भटजींकडे जायची. आणि बऱ्याच वेळानें कागदाच्या पुडींतून विभूति आणून आमच्या डोक्यावर फुंकायची.

भटीण वारल्यानंतर अवघ्या दोनच दिवसांनीं वासुदेव भटजी गेले. पहांटे ते समोरच्या तलावांत आंघोळ करीत. उन्हाळा असो, हिवाळा असो. कैक वर्षांची त्यांची ती संवय. आंघोळ करतांना पाय घसरून ते बुडाले असें कोणी म्हणाले. तर तलावांतलीं कमळें काढतांना त्यांचा तोल गेला असें कोणी म्हणाले. जिवाला कंटाळून त्यांनीं जीव दिला असाहि एखाद दुसरा आवाज आला. पण खरें काय झालें तें कधींच कुणाला कळलें नाहीं. विशेष कांहीं जाणून घेण्याची फारशी कोणी उत्सुकताहि दाखविली नाहीं. पहांटे गोदा आणि कृष्णा यांनीं मोठमोठ्यानें हंबरण्यास सुरवात केली, तेव्हां आसपासच्या लोकांना जाग आली. कंदील घेऊन दोनचार माणसें समाधीकडे आलीं. तरी गायी हंबरतच होत्या. पण भटजी तलावांत बुडाले असतील असें कुणाला वाटलें नाहीं. दुसरीं त्यांचें प्रेत फुगून तरंगलें तेव्हां सर्वांना पत्ता लागला.

वासुदेव भटजींच्या देहाला टेकडीवर भडाग्नि देऊन लोक खालीं उतरले आणि दुसऱ्या दिवशीं त्यांना विसरले. मीहि विसरलों. आज मात्र त्यांची आठवण होते तेव्हां मनांत काहूर माजतें. त्यांच्या हयातींत आपण त्यांच्याशीं बोललों नाहीं. त्या अबोल माणसाच्या जीवनांतली एकहि घटना जाणून घेतली नाहीं. ते भुतासारखे टेकडीच्या पायथ्याशीं कां रहात होते असा प्रश्न त्यावेळीं कधीं मनाला शिवला नाहीं. आतां आठवण झाली म्हणजे वासुदेव भटजींची मूर्ति स्पष्ट डोळ्यासमोर उभी रहाते आणि तो प्रश्न मनांत रुंजी घालतो. भटीण मेल्यानंतर दोनच दिवसांत वासुदेव भटजी बुडून मेले हा एक योगायोग होता कीं यांत अधिक तथ्य होतें ? अशा विचारानें मन कालवल्यासारखें होतें.

अशा किती तरी आठवणीनें मन तुडुंब भरून येतें. गांवाचें नांव काढलें कीं, किती तरी जुनी माणसें, जुने प्रसंग डोळ्यांसमोर येतात आणि हृदय गद्गद् हालतें.

आतां किती तरी वर्षांनीं मी परत चाललों आहे. कोंकणांत माझ्या गांवीं. लहानपणीं बोटीचा भोंगा पहांटे बंदरावरून ऐकूं यायचा. गादींत पडल्यापडल्या तो भोंगा ऐकला, विशेषतः एप्रिल–मे महिन्यांत ऐकला कीं मनावर विलक्षण जादू व्हायची, काजू–गरे–आंबे खाण्यासाठीं मुंबईहून बोटीनें आत्या यायची. भाऊ यायचे. लग्न होऊन सासरीं गेलेल्या बहिणी यायच्या. सारीं माणसें जमली म्हणजे घर गजबजून जायचें. घराला एक वेगळी शोभा यायची. त्यामुळें बोटीचा भोंगा ऐकूं आला कीं सर्वांचे चेहरे डोळ्यांसमोर यायचे.

आतां मी घरीं जातों आहे. बंदरावर बोट पोहोंचताच कर्कश भोंगा होईल, पण भोंगा ऐकून उल्हसित व्हायला मात्र आतां घरीं कुणी नाहीं. कालाच्या प्रवाहांत कांहीं वडिलधारी माणसें कालवश झालीं. उरलेलीं पोटापाण्यासाठीं शहराकडे वळलीं. दार बंद झालें. गांवचा दीर्घकाल संबंध सुटला.

बोटींतून दूरवर किनाऱ्यावर दिसणारे लाल बोडके डोंगर आणि पायथ्याला घेरा घालणारी ती गर्द हिरवळ—होतें तसेंच दिसतें आहे सारें. निदान दिसायला तरी ! किती तरी वर्षांनीं हा भाग मी पुन्हां पहातों आहे. या काळांत डोंगर घटले नसतील असें नाहीं. तींच झाडें तिथें असतील असें नाहीं. पण दुरून डोंगराचा, झाडांचा तोच रंग दिसतो आहे या झाडींत, डोंगरकपारींत लपलेलें माझें गांव आतां कसें दिसत असेल ?

किनाऱ्याकिनाऱ्यानें बोट संथपणें चालली आहे.

समोरच्या गर्द झाडींत एकुलतें एक छोटें बैठें कौलारूं घर दिसतें आहे.

तशीच आमची शाळा होती...अगदी तशीच... !

• • •







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



( पान ९ वरून )

सोमा म्हणाला, 'दोनशे रुपये ? आणूं कुठून ? करूं काय ? आज नाही. उद्या बघूं.'

तशी म्हातारी ओरडली, 'ए ओठतुट्या, गप्प बस.. आजचं काम आज करावं. आण माझं गाडगं.'

पाटलाला सोमाचा पैशाचा वसा समजला. त्याला आनंद झाला. त्याने उतरंड जमिनीवर रिती केली. पैसा पैसा मोजला. अठरावीस रुपये निघाले. बाकी थोडे सोमाचे, उरले सुरले पाटलाचे !

सोमाने एंजिन घेतलें. एंजिन तेल पिऊं लागलें. शेताला पाणी देऊं लागलें. सोमाचें शेत भिजूं लागलें. उसाचा मळा उभा झाला. सोमाचा ऊर भरून आला. पाण्याची ददाद मिटली. सोमाची नड फिटली. बागबगीचा फुलला पण सोमा आपला वसा नाहीं भुलला ! एका कणगीच्या चार झाल्या. गोठा गुरांनीं भरून गेला. शेत झालें हिरवें गार, सोमाच्या आनंदाला नुरला पार !

दिवसामागून दिवस गेले. तासा तासाचा दिवस, दिवसा दिवसाचा महिना, महिन्या-महिन्यांचें वरीस !

दुसरें वरीस उजाडलें. एक दिवस सोमा सकाळीं दुधांत भाकरी भिजवून न्याहारी करीत होता. बाहेर हांक आली, 'सोमाजी, सोमाजी.'

सोमाजी ? सोमाला सोमाजी कोण म्हणत आहे ? आवाज ओळखीचा नाही. माणूस या गांवचा नाहीं.

'याजी या बसा, बसा दुधानं ओला करा घसा. काय गोष्ट, काय मात, आजची आहे कीं उद्याची बात ?'

एक पिकला माणूस आंत आला. घोंगडी अंथरलेल्या खाटेवर बसला. दुधाचा गडू त्याने रिकामा केला. मुंडाशाच्या पालवाने वारा घेतला. जरा वेळाने बोलूं लागला—'सोमाजी सोमाजी, ऐका माझी कथा. माझं नांव सरावन. माझं आहे यादगांवी बन. तुमचा बाप रामाजी. तो आमचा मैतर. रामाजी गेला सोडून गांव. तेव्हांपासून आमची तुटली भाव ! रामाजी माझ्याच वयाचा होता. परवा पाटील-बाबा भेटला. तुमची कथा त्यानं सांगितली. तुमच्या घरीं आलों. घर पाहिलं, दार पाहिलं. वार-शिवार पाहिला, माल-मळा पाहिला. तुमच्या गोठ्यांत हिरवा चारा आहे. मनांत हेतु धरून आलों कीं, माझी कालवड तुमच्या गोठ्यांत आणून बांधावी. सुखानं राहील, कामधंदा करील, भाकर तुकडा करून देईल. दुःखल्याखुपल्याला सेवा करील. तुमच्या पायाला काटा लागला तर तिच्या डोळ्याला पाणी येईल. पोरगी गुणाची आहे, बऱ्या वाणाची आहे ! लागलं सवरलं तर दोन पैसे खर्च करण्याची ऐपत आहे. पाटलाला विचार पसंत आहे. तुमच्या मनीं आलं तर मला बरं वाटेल. पोरगी माझी सुखी होईल. थोडीशी तकलीफ करा. माझ्या दारांत जोडा काढा. घरांत डोकावून पोरगी बघा. बरी वाटली तर पुढें सरूं. पिकल्या केसाची ही घणी आहे. पोरगी माझी गुणी आहे !

हिरवा चारा ! कोवळी कालवड, बापाचा मैतर !

सोमा गोंधळून गेला. आपलें लगीन होऊं शकेल हा विचारच त्यानें कधीं केला नव्हता. त्याच्या पुढें मारोतीच्या पाराजवळची त्याचीच मूर्ति दिसली. आणि आतां हें पिकलें खोड पाडाचा आंबा पदरांत टाकायला आलाय. पाटलाला बेत पसंत आहे. म्हातारी खुणा करीत आहे.

सोमा म्हणाला, 'दादाजी दादाजी, तुमची आण ती आमची वाण. तुमचा शब्द खोटा नाहीं. पाटलाचा आशीर्वाद आणि माझ्या मायची खूण, तुम्ही. आज सकाळीं सकाळीं सूर्यासारखे आलांत माझ्या घरांत उजेड झाला. पोरगी बघायचं काम नको आणि तुमचा मला छदाम नको.'

सगळें ठीक झालें. पाटलाच्या, म्हातारीच्या, विठ्ठलकाकाच्या आशीर्वादाने सोमाचें लगीन झालें. गाईचें कपाळ कुंकवानें भरलें. तुळशीचें आळें दह्यादुधानें भरलें. म्हातारीला नवें लुगडें चढलें आणि पाटलाच्या पायावर सोमाचं अन् जनीचं मस्तक पडलें !

वरात निघाली. जना घरांत आली. दोन दिवस राहिली. पहिली खेप म्हणून माहेरी परत गेली. सोमाने जना पाहिली. त्याला ती शेतांतल्या पपईवाणी दिसली. जनानें सोमाला पाहिलें पण— !

दोन दिवसांनीं जना माहेरीं गेली. तिचं मन उललें नव्हतें, तिचं मन फुललें नव्हतं.

बाप म्हणाला, पोरी पोरी, अशी कागे दिसतेस ? जना म्हणाली, 'बापाजी बापाजी, काय सांगूं ? कसं सांगू ? सासर माझं छान आहे, घरा-भोंवतीं हिरवं रान आहे ! मला घरांत मान आहे, पण काय सांगू ! कसं सांगू—?

शेवटी लाजत कसें तरी तिनें सांगून टाकलें. खेड्यांतली पोरगी. मनांत कधी ठेवणार नाही, खरें सांगायला भिणार नाहीं. सगळें ठीक आहे पण—सोमाचा फाटलेला ओठ—

जनाच्या बापाने आपल्या दृष्टीने सोमाला पाहिलें होतें. पण आता त्याला जनाची अडचण कळली. त्याने जनाचा गालगुच्चा घेतला. 'करतों पोरी, कांहीतरी करतों. तू घोर करूं नकोस. सुखाचं अनमान धरूं नकोस.'

जनीचा बाप सरावन घरून निघाला. त्याने पाटगांव जवळ केला. पाटलाच्या वस्तींत बूड टेकलें—'पाटीलबाबा, पाटीलबाबा !'

दोन पिकलीं पानें बराच वेळ हालत राहिलीं, बोलत राहिलीं, डोलत राहिलीं. पाटील म्हणाला, 'सरावन रे सरावन, घोर करूं नको. अरे दिवस बदलला आहे. काळ सुधारला आहे. दुनिया बरी झाली आहे. चल करतों व्यवस्था.'

पाटील सरावनला घेऊन निघाला, सोमाला त्याने बरोबर घेतलें. तिघेजण सोमाच्या बैलगाडींतून जवळच्या शहरांत गेलें.

चांगले दवाखाने निघाले होते. चांगले समजूतदार डॉक्टर होते. सोमाचा ओठ शिवून निघाला. चार आठ दिवसांत सगळें ठीक झालें. तिघे आपापल्या घरीं गेले. घरीं येतांच सोमाने आरशांत पाहिलें आणि कधी नव्हे ते त्याच्या तोंडीं एक फक्कडसें गाणें आलें !

चारआठ दिवसांत जना आली. तिची आणि सोमाची नजरानजर झाली. सोमाला जना दिसली. पपईवाणी जनाला सोमा दिसला.

उसावाणी जनी हंसली, मोती सांडले. सोमा हसला, पांग फिटले !

आतां आजकाल काय होतें सांगूं ? जनी गोड गोड बोलते तेव्हां सोमाचें मन फसून जातें आणि सोमा शेतांतून उशिरा आला तर जना रुसून बसते. म्हातारी हंसते. गाडग्यांत हात घालते आणि पैशाची साखर अर्धी सोमाच्या हातावर, अर्धी जनीच्या हातावर ! म्हातारी पडवीत येते आणि घराचे दार लावून घेते.

जनीचे आणि सोमाचें राज्य उसा-पपईच्या मळ्यांतलें !

ऐका ऐका भावांनो, ऐका ऐका बहिणींनो, संपली आमची कहाणी. कहाणी कष्टाची. कहाणी काळ्या मायची. बुढे बुढे नमस्कार, पाटील-बाबा राम राम, अगे जनाबाई, अगा सोमाजी, आतां आमचें संपले काम !

जसें त्यांनीं राज्य केलें तसें तुम्ही करा. उतूं नका मातूं नका. घेतला वसा टाकूं नका. एंजिन घेतां चुकूं नका. गाडग्यांतल्या पैशाला मुकूं नका.

कहाणी आहे जुन्या वेशाची पण आहे आपल्या मराठी देशाची
आमची कहाणी सरो. तुमचे आमचें पोट भरो ! ●●●






# प्रवास माझ्या गोमंतकाचा

*ज्या गोमंतकांत निःस्वार्थी समतेची वृत्ति समाजांतल्या सर्व थरांत ठायीं ठायीं भरलेली होती, सर्व भारतांत ज्याची विनम्र गुणाबद्दल ख्याति होती, त्याच गोमंतकांत आज काय आढळतें.................. ?*

—गोपालकृष्ण भोबे

स्वार्थपरायणवृत्ति, बेमुर्वतपणा, माजोरी, अहंमन्यता, चोरी, लबाडी इत्यादि दुर्गुण गोमंतकांत यापूर्वी औषधाला देखील आढळत नव्हते. मौल्यवान वस्तूंनी भरलेली एखादी ट्रंक वाफोराच्या धक्क्यावर किंवा मोटार स्टँडवर एका बाजूला ठेवून खुशाल आपल्या कामाला निघून जावें. काय बिशाद होती कुणी त्या वस्तूला हात लावील याची ! अधिक काळपर्यंत ती तिथें पडून राहिली, तर तिची चौकशी व्हायची. चपला, छत्र्या अशा गोष्टी चोरीला जायची तर कधीं भ्रांतच नव्हती. आपणच अनवधानानें त्या कुठें तरी हरवाव्यात. आठ–पंधरा दिवसांनी त्या सांपडतहि असत; पण चोरीला जाण्याची शंका नव्हती. एकमेकांबद्दल संपूर्णपणें विश्वास होता. एकाद्या घरीं कार्य निघालें तर दुसऱ्याच्या घरचा जडावाच्या दागिन्याचा साज मागून आणला जाई. आणि देणाऱ्याची भावनाहि अशी होती, कीं त्या घरचा कमीपणा तिसऱ्याला दिसूं नये. दागिन्यांनीं भरलेला तो पितळेचा डबा देतांना–देणाऱ्यानें–त्यांतल्या वस्तु अमुक किंमतीच्या आणि संख्येनें अमुक आहेत असें कधीं सांगितलें नाहीं; किंवा परत घेतांना तो समक्ष उघडून शहानिशा केली नाहीं. अविश्वासाची भावनाच नव्हती.

आंब्यांचे घोस, फणसांचे घोस, नारळांचे घोस एखाद्या आंठ वर्षांच्या मुलानें हात उंचावला तर त्या हातांत येतील इतक्या उंचीवर लटकत असत; परंतु जें आपलें नाहीं तें घ्यायची मुळीं बुद्धीच होत नसे. साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकरांनीं याबाबतींत एक सुंदर आठवण लिहून ठेवलेली आहे. तात्यासाहेब गोव्यांत गेले होते तेव्हांची गोष्ट. एका होडींतून ते पलीकडे जात होते. अलीकडच्या किनाऱ्यावर–जिथें होडी लागे, तिथल्या उंचवट्यावर एक मोठें फणसाचें झाड होतें. फळांनी तें अगदीं भारावलें होतें. खालींच बुंध्यावर एक भला मोठा फणस पिकून उतार झाल्यामुळें त्याचा खमंग वास आसमंतांत पसरला होता. रसभृंग त्या फळाभोंवती घिरट्या घालीत होते. तें दृश्य पाहून तात्यासाहेबांना आनंद झाला. होडींत बसल्यावर त्यांनी नावाड्याला विचारलें, "काय रे, पिकून उतार झालेला तो फणस काढून तूं खात कां नाहींस ?"

तात्यासाहेबांच्या प्रश्नानें तो नावाडी स्तिमित झाला. असा भयंकर प्रश्न गोव्यांत कुणी करील हें त्याच्या स्वप्नींहि नव्हतें. पाहुण्याला उत्तर दिलेंच पाहिजे म्हणून नम्रपणें तो फक्त एवढेंच उत्तरला—

"छे, छे ! दुसऱ्याच्या वस्तूला परवानगीखेरीज कधीं हात लावतात ?"

त्या अशिक्षित माणसाचे ते उद्‌गार ऐकून त्या साहित्य–भीष्मांना गहिंवरून आल्यास नवल नाहीं.

ज्या गोमंतकांत अशी निःस्वार्थी समतेची वृत्ति समाजांतल्या सर्व थरांत ठायीं ठायीं भरलेली होती, त्याच गोमंतकांत आज काय आढळतें ?

मी अनुभवलेली बसमधली एक लहानशीच गोष्ट घ्या. गोमंतकांत बसच्या मार्गाला 'स्टॉप' नाहींत. त्यामुळें मुख्य ठाण्यापासून दीड–दोन मैलांच्या अंतरावर ज्याला जिथें उतरावयाचें असेल तिथें त्यानें ड्रायव्हरला "थांबय रे" म्हटलें, कीं बस थांबते. अशाच एका बसमध्यें मी होतो. एका ठिकाणीं ड्रायव्हरला थांबायला सांगून एक माणूस उतरला. गाडी चालू झाली आणि एक यार्ड पुढें गेलीं नाहीं तर पुन्हां आवाज आला.

"थांबय रे" पुन्हां गाडी थांबली. तिथें एक कुळवाडी उतरला. फिरून दोन फुटांच्या अंतरावर तिसऱ्यांदा आवाज आला. माझें डोकें उठलें आणि चौथ्यांदा असें झालें तेव्हां तिथें उतरणाऱ्या एका फाटक्याशा माणसाला मी म्हटलें. "तुम्हीं सगळे एकाच ठिकाणीं कां उतरलां नाहीं. वास्तविक आतांपर्यंत तीन माणसं उतरलीं तें अंतर फार तर दहा यार्डांचं असेल !"

माझ्याकडे तुच्छतेचा एक जळजळीत कटाक्ष टाकून आणि माझ्या सदऱ्या जाकिटाकडे पाहात तो म्हणाला, "ही मुंबय न्हंय, हें गोंय ! समजलॉ ?" आणि तो ताडताड पावलें टाकीत निघून गेला. मी खजिल झालो.

सामोपचाराची गोष्ट सांगण्यास गेलों आणि प्रकरण हें असें आंगलट आलें !

म्हापसेंपासून सांखळीपर्यंत मधल्या रस्त्यावरचे अनेक साकव आणि पूल मोडल्यामुळें आमची बस–पाण्याचा ओहोळ जशी वाट काढतो तशी–वाकडी तिकडी वळणें घेऊन जात होती. माणसांनी खच्चून भरलेली ती बस कठीण अशा उतारावरून जाऊं लागली कीं पोटांत भीतीचा गोळा उठत होता. शेवटीं एकदां ती सांखळीला येऊन पोहोंचली. इथें ती पंधरा-वीस मिनिटें थांबणार होती. मी खालीं उतरून बाहेरची हवा अंगाला लागावी म्हणून जरा एका छपराच्या आडोशाला उभा राहिलों. इतक्यांत–राजकपूर वापरतो तसली–एक लाल भडक लांबरुंद मोटार आमच्या बसच्या शेजारींच येऊन उभी राहिली. धुळीचा एक लोट हवेंत उडाला. एक टकल्या पण अद्यावत् कपडे घातलेला, दिसण्यांत बटलरसारखा दिसणारा इसम गाडींतून उतरला––सिनेमा नट वापरतात तसला–चकचकीत फ्रेमचा गॉगल त्यानें डोळ्यांवरून बाजूला केला आणि ऐटीने सभोंवार नजर फिरवितांना छपराखालीं उभ्या असलेल्या माझ्यावर त्याची दृष्टि स्थिरावली. तिथूनच त्यानें ऐटींत अभिवादन केलें. तो कोण आहे हें मला कळेना. मी दोन पावलें पुढें झालों आणि लगेच मला ओळख पटली – तो भासू शिलिमखान होता. मी आणखी पुढें सरकलों नाहीं; पण तोच जरा जवळ आला. माझी थोडीशी चौकशी करून मला आपादमस्तक न्याहाळींत तो म्हणाला–

'तूं हें करता, तें करता, खूपशो गोष्टी करता म्हुणून आयकतां—'

आणि डबोलं दाखवताना हातांचा अभिनय करतात तसे हात करून तो म्हणाला—

'कितेंय केलां मरे ?'

मला त्याचा राग आला. आपल्याच मस्तींत गुंग असलेल्या आणि सारी दुनिया आपल्या पंजांत सांठवल्याच्या समजुतीनें त्यानें माझ्या मिळकतीचा तुच्छतेनें कां अंदाज घ्यावा ? असेल–भासू शिलिमखान गंजांत लक्ष्मीचा मालक असेल ! त्यानें केलेल्या सहस्र अपराधांची जंत्री चित्रगुप्ताच्या वहींत पुण्याच्या खातीं जमा झाली असेल ? म्हणून काय त्यानें आढ्यतेनें असे प्रश्न करावेत !

मी म्हटलें –' हें बघ भासू, मी फक्त हें आणि तेंच करायला जन्माला आलेलों आहे...
'आणि मग त्याच्यासारखेच डबोलं दाखवितांना करतात तसे–हात करीत मी म्हटलें—

'हें करण्याकरितां परमेश्वरानें तुला जन्माला घातलेलं आहे' मला नव्हे !'

थोडेसें हंसल्या न हंसल्यासारखें करून भासू आपल्या गाडींत जाऊन बसला आणि भर्रकरून निघून गेला. हॉटेलच्या मटारखान्यांतून रस्त्यांत वाहात आलेलें सांडपाणी त्याच्या मोटारीच्या चाकानें कापलें आणि माझ्या लेंघ्यावर त्याचे लाल लाल शिंतोडे उडाले.

मला आठवतं–अठ्ठेचाळीस–एकोणपन्नास सालापर्यंत भासू इथें या मुंबईत होता. दंग्याच्या काळांत आपल्याला आडनांवावरून मुसलमान समजून मारतील म्हणून तो फार सावधगिरी बाळगी. जुगार आणि सट्ट्याचा आकडा या दोन गोष्टी त्याचा व्यवसाय होता. सदा सचिंत मुद्रेनें तो फुटपाथवर उभा असे. अनेकांना त्यानें व्यसनाला लावलें होतें-एकोणिसशें पन्नासांत तो गोव्याला गेला आणि स्वातंत्र्यवाद्यांच्या गुप्त चळवळीच्या बातम्या पुर्तुगेज पोलिसांना पुरवतां पुरवतां, गोऱ्या सोजिरांना कसला तरी पुरवठा करण्याचें कंत्राट त्याला मिळालें. झालें, हळूहळू त्यानें आपलें जाळें पसरलें. धर्मानें हिंदु असून गुरांचें, डुकराचें मांस देखील तो लष्कराला पुरवित असे. पैसा मिळविण्याचें कोणतेंहि निंद्य कर्म त्यानें सोडलें नाहीं. पुर्तुगेज शासनसंस्थेंत वावरणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या गळ्यांतला तो ताईत बनला. गुप्त संघटनेंतल्या अनेक राष्ट्रवाद्यांना त्यानें पकडून दिलें. एखादा स्वातंत्र्यधार्जिणा भेटला कीं तो त्यांच्याविरुद्ध सरकारकडे तक्रार करी. भासूविरुद्ध ब्र काढायची कुणाची ताकद नव्हती.

हां हां म्हणतां, त्याचा व्यवसाय इतका वाढला कीं त्याचे हात पुर्तुगालपर्यंत पोंचले. आपली लहानसहान कामेंहि तो पुर्तुगालहून करून आणी. कित्येक वेळां तो पुर्तुगालला जाऊन आला होता. त्याचा तळतळाट व्हावा म्हणून लोक अनेक परीनीं परमेश्वराची प्रार्थना करीत, पण भासू शिलिमखानाचें कूसहि वांकडें झालें नाहीं. पुर्तुगेज सरकारच्या युद्धफंडला सर्वांत मोठी मदत भासूनें केली आणि लोकांची इच्छा नसतांनादेखील सक्तीनें करून घेतली. जो कोणी विरुद्ध बोले त्याची तक्रार पुर्तुगेजद्रोही म्हणून तो करीत असे. निदान भारत सरकारनें गोव्यांत प्रवेश केल्यानंतर भासूच्या अपराधांचें प्रायश्चित्त त्याला मिळेल अशी लोकांना आशा होती; पण छे ! कसचें काय आणि कसचें काय ! गोमंतक स्वतंत्र झाला. पुर्तुगेज निघून








नाविन्यपूर्ण! अभूतपूर्व !!

# साहित्य-रस स्पर्धा ६ वा वर्षारंभ क्र.१०८

## रु. ५१,०००

पहिलें बक्षीस रु. ४०,०००

दुसरें बक्षीस रु. ५,००० आकर्षणांसाठी रु. ६,०००

## साहित्य-रस स्पर्धा क्र.१०८ ची अधिकृत प्रवेश-पत्रिका

बक्षिसें रु. ५१,०००

पत्ता.- साहित्य-रस स्पर्धा क. १०८
नीतीन मॅन्शन, खेतवाडी ७ वी लेन, मुंबई ४

अखेरची तारीख १२-७-६२

| १ प्रवेश-फी:१ रुपया | | | २ प्रवेश-फी:१ रुपया | | | ३ प्रवेश-फी:१ रुपया | | | ४ प्रवेश-फी:१ रुपया | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ प्र | | | १ प्र | | | १ प्र | | | १ प्र | | |
| २ | | क | २ | | क | २ | | क | २ | | क |
| ३ सु | | | ३ सु | | | ३ सु | | | ३ सु | | |
| ४ | पा | चें | ४ | पा | चें | ४ | पा | चें | ४ | पा | चें |

या स्पर्धेत भाग घेतांना मी असें कबूल करतों कीं, माझें वय १८ च्या पुढें असून साहित्य-रस स्पर्धेचे नियम व अटी मला मान्य आहेत व त्या माझ्यावर बंधनकारक आहेत. संपादकाचा निर्णय मी मान्य करीन व कायदेशीर आहे असें समजेन.

प्रत्येक प्रवेश-पत्राची प्रवेश फी १ रुपया आहे. संपूर्ण प्रवेश-पत्रीकेची प्रवेश फी ४ रुपये. जोडलेली म. ऑ पावती, पोस्टल ऑर्डर अगर साहित्य-रस स्पर्धा रोखीची पावती

क्रमांक ______ प्रवेश-फी रु. _____

१०८

संपूर्ण नांव ______________________

पूर्ण पत्ता ______________________

### ४ विधानें

(१) सद्यःकाळीं लोकरंजनाचें प्रभावी व प्र * * साधन चित्रपटच होय.

(२) हिंदी महिलाजगांत * * क क्रांति घडवून आणणें हें एक ऐतिहासिक कार्य आहे.

(३) जगांत आज वैचारिक संघर्षच सर्वांत प्रखर संघर्ष असल्यामुळें सहजीवन सु * * राहिलेलें नाहीं.

(४) * पा चें श्रेष्ठत्व वैदिक काळापासून मान्य करण्यांत आलेलें आहे.

हीं विधानें लेखकांच्या लिखाणांतून घेतलेलीं अवतरणें होत. लेखकांचे शब्द हींच अधिकृत उत्तरें होत.

### तपशील

पहिलें आकर्षण बंद : २९ जून

दुसरें आकर्षण बंद : ६ जुलै

**अखेरची तारीख**
गुरुवार, १२ जुलै

**अधिकृत उत्तर**
मराठा : १५-७-६२

**विजेत्यांची यादी**
साहित्य-स्वप्न २२-७-६२

**३ आठवड्यांत बक्षिसांची रवानगी**
१२-८-६२ रोजीं

साहित्य-स्वप्न, प्रवेश-पत्रिका, पावत्या व पाकिटें ठिकठिकाणीं एजटांकडे मिळतात.

गेले. भासूचें वांकडे होणार म्हणून वाट पाहाणाऱ्यांचेंच वांकडें झालें; पण भासू आहे तिथेंच आहे. आपलीं लहानसहान कामें तो थेट दिल्लीला जाऊन करून घेतो. पहिलें मोठें 'परमिट' त्याला मिळालें आणि भारत सरकारचे कांहीं वरिष्ठ अधिकारी तर त्याचे मित्र झालेले आहेत. त्याचा तळतळाट मागणाऱ्या लोकांची तर आतां अशी खात्री झाली आहे, कीं ज्याअर्थी सरकार किंवा परमेश्वर त्याच्या असंख्य अपराधांबद्दल त्याला कांहीहि करूं शकत नाहीं त्याअर्थी भासू हाच प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतार आहे.

मी तर असें ऐकतों कीं कोंकणी आणि मराठीवाद्यांना डावलून गोमंतक हा कानडी भाषिक व्हावा यासाठीं भासूचे प्रचंड प्रयत्न चालू आहेत. या बाबतींत म्हैसूरच्या कांहीं श्रीमंत व्यापाऱ्यांनीं भासूला हवी ती मदत द्यायची तयारी केलेली आहे. भासू त्यांत यशस्वी होवो न होवो, पण एवढं मात्र निश्चित, कीं तो आपल्या मिळकतींत हजारों रुपयांची भर घालील. एका नव्या उत्पन्नाचा मार्ग अनायासें त्याला सांपडलेला आहे. 'नवरा मरो नवरी मरो भटास दक्षणेशीं कारण' तसेंच भासूचें आहे. नुकत्याच झालेल्या कोंकणी परिषदेस मदत म्हणून वीस हजार रुपये जे म्हैसूर सरकारने दिल्याची बातमी आहे ते मिळविण्यांत भासूचा हात आहे असें लोक बोलतात. भासूने त्यांतले पांच सहस्र तरी निश्चित कमिशन म्हणून पचवले असावेत. असेंहि लोक बोलतात. असो! सांगायचें तात्पर्य एवढेंच कीं केवळ भासू शिलिमखान हा एकच माणूस आल्या संधीचा फायदा घेऊन आपलें उखळ पांढरें करून घेतो असें नव्हे; तर गोव्यांत असे शेंकडों 'भासू' आहेत, कीं एका स्वार्था-शिवाय त्यांना कशाचीहि किंमत वाटत नाहीं. पूर्वी श्रद्धा ही कुलाचारा-प्रमाणें संभाळली जात असे. वडील माणसासमोर--चांगली कर्तीं माणसें देखील विडी-सिगारेट ओढीत नसत, पान खात नसत. जातीजातींत वैमनस्यें नव्हती; पण मर्यादा पाळल्या जात असत. आज पाहावें तो सोळा वर्षांचा पोरगा 'कॅप्स्टन' सिगारेटचा धूर-बसमध्यें आपल्याजवळ बसलेल्या-एखाद्या पोक्त माणसाच्या तोंडावर खुशाल सोडतो. जोंपर्यंत भासू शिलिमखानासारखे अमर्याद पुरुषोत्तमाचे आदर्श त्यांच्यासमोर आहेत तोंपर्यंत त्यांच्या भावि आयुष्याचें अकल्याण होईल, ही भीति बाळगण्याचें त्यांना कारण नाहीं.

× × ×

माझी सर्व कामें आटोपून शिरू अप्पांकडे पोहोंचेपर्यंत संध्याकाळचेसाडे पांच वाजले. मला पाहातांच अप्पानीं हातांतली काठी जवळच्या खांबाला टेकवून ठेवली आणि मोठ्यानें माझें नांव उच्चारून मला घट्ट मिठी मारली. माझ्या तापलेल्या भावनांना निर्मळ झऱ्याचा स्पर्श झाला. अप्पांनी दोन तीन वेळां माझ्याकडे पाहिलें. त्यांचे डोळे भरून आले होते. माझ्या हाताला धरून ते म्हणाले-"चल, घरांत जायच्या आधीं देवतेचं दर्शन घेऊन येऊं!" मी कांहीहि न बोलतां त्यांच्या पाठून निघालों. बारा वर्षांनी मी अप्पांना पाहात होतो. ते होते तसेच होते. डोक्यावर तांबड्या मखमलीची चौकोनी टोपी, कपाळावर उभा जाडसर अंगारा आणि लाल वाटोळें अक्षत. अंगावर बाराबंदी. खालीं स्वच्छ धोतर. पायांत पुणेरी जोडा. सर्व वेष होता तसाच होता. त्यांत किंचितहि बदल झालेला नव्हता. ते देवळांत गेले. प्रवेशदारा-जवळची घंटा त्यांनीं जोरांत वाजवली आणि त्या घटानादांत आपला गंभीर स्वर मिसळून 'जगदंब उदयोस्तु, उदयोस्तु' असं त्रिवार उच्चारून सभामंडपांतच त्यांनी देवतेला साष्टांग नमस्कार घातला. घंटा वाजल्याबरोबर भटजी आले. त्यांच्याकडून प्रसाद व अंगारा घेऊन आपल्या चिमटींत धरून तो कुरतडून आपला आंगठा त्यांनी माझ्या कपाळावर ठेवला आणि "कल्याण कर गे नवदुर्गे!" असं म्हणुन मला भला मोठा अंगारा लावला. अंगांतल्या कणाकणांत श्रद्धा जागृत झाली. आणि वाटूं लागलें; अप्पांसारखीं माणसें अजून इथें जिवन्त आहेत म्हणून कदाचित् गोमं-तकाचा विध्वंस झाला नसावा.

'चल, तुला पुष्कळ गोष्टी सांगायच्या आहेत!' असें म्हणून अप्पा मला आपल्या घरीं घेऊन आले. •••



## गेल्या पिढींतील एक चतुरस्र चित्रकार श्री. केतकर यांचें शोचनीय निधन

'केतकर्स आर्ट इन्स्टिटयूट' या संस्थेचे संस्थापक व चालक श्री. कृष्णराव रघुनाथ केतकर ए. एम. हे दिनांक १९ रोजीं दम्याच्या विकारानें विलेपार्लें येथील आपल्या निवासस्थानी निधन पावले, मृत्यु-समयीं त्यांचें वय ७० वर्षांचें होतें. केतकर आर्ट इन्स्टिटयूटच्या विद्यार्थ्यां-पैकीं अनेक विद्यार्थी नांवारूपास आले. परदेशी मान्यता पावले व आज त्यांनीं मुंबईत श्रेष्ठ कलावंत निर्माण केले. मुंबईत निघालेल्या आर्ट स्कूलच्या चालकांपैकीं अनेक श्री. केतकरांचेच विद्यार्थी आहेत. केतकर्स आर्ट इन्स्टिटयूट काढतांना ते महापालिकेच्या शाळेंत ड्राइंग मास्तर होते. त्यांच्या पत्नी श्रीमती गुलाबबाई याहि महा-पालिकेच्या एक शिक्षिका आहेत. श्री. केतकर यांना कलेचें इतकें वेड होतें कीं, त्यांना दुसरें कांहीं सुचत नसे. संगीत हा त्यांचा आवडता विषय होता. वृत्तपत्रांत गोष्टींची चित्रें देण्याचा प्रयत्न प्रथम यांनींच केला. श्री. केतकर यांच्या निधनानें कलामित्र, एक ४८ वर्षे संस्था चालविणारा संघटक व समाजसेवक नाहींसा झाला आहे. 'दीपावली' वार्षिकाचें ते नेहमींच मनःपूर्वक कौतुक करीत असत. त्यांच्या असंख्य स्नेहीमंडळींच्या व कुटुंबि-यांच्या दुःखांत आम्ही सहभागी आहोंत.

—संपादक

हें मासिक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०।४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रकाशित केलें.



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट